पाचूंची लकेर, कुरणाच्या ओठी,
प्रकाशाचा गर्भ, जलवंती पोटी
अखंड नूतन मला ही धरित्री,
आनंदयात्री मी आनंदयात्री.
मेघांच्या उत्सवी, जाहलो उन्मन,
दवात तीर्थाचे, घेतले दर्शन
दूर क्षितिजाची, निळी भुलावण,
पाशाविण मला, ठेवी खिळवून.
अक्षयवीणाच घुमे माझ्या गात्री,
आनंदयात्री मी आनंदयात्री

याप्रमाणे या कवितेत पाडगावकरांची निसर्गाच्या सहवासात जी उन्मन, उत्फुल्ल अवस्था झालेली आहे तिचा प्रत्यय येतो, पाडगावकरांची सौंदर्यवादी रोमँटिक प्रवृत्तीही आहे. ती 'जिप्सी' या कवितेत पहावयास मिळते. लहानपणापासून त्यांचे मन घरात रमत नाही. शाळेच्या चार भिंतीत त्यांचे मन ठरायचे नाही. झाडे आपल्या पानांच्या हातांनी त्यांना बोलवायची-शेपटीच्या झुबक्याने खार खुणवायची. त्यांच्या डोळयांसमोर डोळे मिटताच डोंगर उभा रहायचा, खळखळणाऱ्या लाटा, सळसळणारी पाने, दूर पळणाऱ्या वाटा जाणवायच्या. त्यांना ज्ञात विश्वाची चौकट जाचू लागायची व उरी वेगळीच प्रतीती यायची. या त्यांच्या रोमँटिक वृत्तीचे अत्यंत काव्यमय वर्णन पाडगावकरांनी केले आहे –

"खेळ मांडिलेला सारा पुन्हा उधळाया सजे
आपणच निर्मिलेले आपणच मोडू धजे
गूढ अज्ञात धुक्यात आणि जातसे बुडून
एक जिप्सी आहे माझ्या खोल मनात दडून
घर असूनहि आता घर उरलेले नाही
चार भिंतींची जिप्सीला ओढ लागलेली नाहीं
कुणी सांगावे ? असेल पूर्वजन्मीचा हा शाप
घडी सुस्थिरपणाची विसकटे आपोआप
कुणी तरी साद घाली दूर अनंतामधून ।
एक जिप्सी आहे माझ्या खोल मनात दडून ॥

– अशा प्रवृत्तीचे पाडगावकर आपल्या प्रतिभेची 'तृणाच्या फुला'च्या प्रतिभेने रसिकांना ओळख करून देतात. त्यांची प्रतिभा बलात्काराने फुलणार नाही असेच जणू काय ते तृणाच्या फुलाच्या शब्दांतून सांगतात –

जरि तुझिया सामर्थ्याने
ढळतील दिशाही दाही
मी फूल तृणातिल इवले
उमलणार तरिही नाही.
... ... ...
रे तुझिया सामर्थ्याने
मी कसे मला विसरावे
अन् रंगांचे गंधांचे
मी गीत कसे गुंफावे.
... ... ...
मग ही प्रतिभा कुठे फुलणार ?
जिंकील मला दवबिंदू
जिंकील तृणाचे पाते
अन् स्वतःस विसरुन वारा
जोडील रेशमी नाते
कुरवाळित येतिल मजला
श्रावणातल्या जळधारा
सळसळून भिजली पाने
मज करितिल सजल इषारा.

या निसर्गात पाडगावकरांच्या प्रतिभेचे 'तृणफूल' उमलेल, त्या प्रतिभेला नाजुकसुंदर सोबत हवी आहे. त्या ओढीने ते बोलावतात–

येशिल का सांग पहाटे
किरणांच्या छेडित तारा
उधळीत स्वरांतुन भवती
हळु सोनेरी अभिसारा ?
शोधीत धुक्यातुन मजला
दवबिंदू होउनि ये तू
कधि भिजलेल्या मातीचा
मृदु सजल सुगंधित हेतू.

पाडगावकर निसर्गाशी एकरूप होऊ इच्छितात-
"तू तुलाच विसरून यावे मी तुझ्यात मज विसरावे,
तू हसत मला फुलवावे, मी नकळत आणि फुलावे ॥"

पाडगावकरांची प्रतिभा अशी सुंदर, नाजुक, मुलायम, संवेदनक्षम स्त्री आहे आणि तिने काव्य-निर्मितीच्या कवितांतून असे सौंदर्य पेरलेले आहे.

## २) निसर्गकविता

पाडगावकरांच्या काव्याची अगदी पहिली प्रेरणा निसर्ग होय. त्यांचे बालपण कोकणात वेंगुर्ल्याला गेले,

"हिरव्या चवऱ्या ढाळणारे माड, निळे आकाश, आपल्याच तंद्रीत पळणाऱ्या लाल मातीच्या वाटा" या सर्वांनी त्यांच्याशी नाते जोडले आहे. निसर्गाच्या विविध अवस्थांचे दर्शन या काळात त्यांना अनायासे घडले. या सर्व अवलोकनाचा त्यांच्या कवितेवर फार खोल परिणाम झाला आहे. इतकेच नव्हे तर त्यांची कवितासुद्धा निसर्गमय झाली आहे. आपल्या सर्व भावभावना पाडगावकर निसर्गातील प्रतिमांच्याच द्वारा रेखाटतात. निसर्गाची मदत घेतल्यावाचून त्यांच्या प्रतिभेला बोलणेच अशक्य होते. केवळ निसर्गचित्र रेखाटणे, आपल्या भावना निसर्गाच्या प्रतिमांद्वारा व्यक्त करणे, निसर्गातील रूपके करून काही आशय व्यक्त करणे इत्यादी स्वरूपात त्यांच्या कवितेत निसर्ग आला आहे.

आपल्या निसर्ग-कवितांत पाडगावकरांनी 'सौंदर्याचे पारदर्शक विश्व' निर्माण केले आहे. आपल्या थरथरत्या भावजीवनाने ओथंबून वाहणारी निसर्गाची विविध क्षणचित्रे पाडगावकरांनी चित्रित केली आहेत. 'खडक' कवितेचे उदाहरण पहा—

निवली खळबळ
निवांत झुलती लाटा
कधीच गेल्या
रेतीवरल्या पुसून वाटा
पुळणीवरती
तरल ओलसर शांती
तृप्त उन्हाची
पिवळी रेशिमकांती
उठती अलगद
पाण्यावरती तरंग
नुकता न्हाउन
संथपणाने
खडक वाळवी अंग

— पुळणीवर झिलमिळत्या उन्हात संथपणाने आपले अंग वाळवीत बसलेल्या या खडकाप्रमाणेच अनेक चित्रे पाडगावकरांनी रेखाटली आहेत. "शांत किनारा" मधील पुढील निसर्गदृश्य किती विलोभनीय आहे ते पहा :—

स्निग्ध पहाटे। कोवळे आकाश। लाटात दाटे। दूरात अंधुक। चमके तारा। शांत किनारा॥ अबोध शांती। हलके ठिबके। केशर कांती। लहरी चुंबीत। लहरे वारा। शांत किनारा। कापरे पाणी। सुरूच्या बनात। धूसर गाणी। आतुर आकाशविणेच्या तारा। शांत किनारा॥ अथांग सारे। आकाश सागर। डोंगर वारे। लोकरी ढगात। आनंदधारा। शांत किनारा॥

निसर्गाच्या सुंदर निवांत रूपात कवीची भाववृत्ती सुद्धा सुंदर, शांत, निवांत, आनंदमयी कशी होते ते अशा कवितात पहावयास मिळते. ती भाववृत्ती अत्यंत लयबद्ध होते त्यामुळे शब्दांनाही एकप्रकारची लय येते आणि अनुप्रास-यमकांच्या अलंकारांनी सुशोभित होऊन ती शब्दरचना लयबद्ध पावले टाकू लागते असा अनुभव रसिकांना पाडगावकरांची ही निसर्गचित्रे वाचताना येतो. 'रात्र भिजली' व 'निवांत' या कविता याच संदर्भात वाचण्यासारख्या आहेत.

रात्र भिजली। कापऱ्या तंद्रीत। पाने निजली। काजवा उडे। एकला झुरत। मालवे... बुडे। निथळे हळू। मधेच एखादा। थेंब लाजाळू। दाट सावळ्या। पागल मंथर। भारावलेल्या!। जमीन काळी। मातला अंधार। घट्ट कवळी। हे "रात्र भिजली" मधील एक निसर्गक्षणचित्र आहे. 'निवांत' मधील अनुभव असाच आहे. कवितेचे भावजीवन थरथरताना येणारा अनुभव त्या निसर्ग दृश्यात व्यक्त झाला आहे.

कोवळ्या पाण्याचा लख्ख आरसा। त्यात डोकावे शुभ्र ढगाचा गुलजार-ससा। लवचिक सर झडून गेली। भिजल्या पानी शीळ वाऱ्याची जाहली ओली। शालीन कौलांची कुलीन घरे। आतिथ्यशील कोणाची वाट पाहती बरे?

—अशी अनेक सुंदर, भावपूर्ण व थरथरती क्षणचित्रे पाडगावकरांनी 'जिप्सी'तील निसर्गकवितांत रेखाटली आहेत. सगळ्या कवितांत निसर्गाची तीच तीच दृश्ये चित्रित होतात. सळसळणारी पाने, शीळ घालणारा वारा, दाट झुलणाऱ्या सावळ्या, प्रतिबिंबाचे गूढ इषारे देणाऱ्या लाटा, आकाशातील विविध रंग, फुलांतील विविध प्रकारचे गंध, स्तब्ध उभे माड, एकटाच तारा किंवा एकटाच तरंगणारा मेघ, दवबिंदूतील थरथरणारे सौंदर्य, याच निसर्गविषयक सौंदर्यानुभूती पाडगावकरांना वेळोवेळी आलेल्या आहेत. परंतु त्यांचे बदलते भावजीवन त्याच सौंदर्यानुभूती बदलत्या स्वरूपात प्रत्ययाला आणण्याचे काम करते. 'निवांत'










मध्ये 'पाऊलवाटेला लाडिक घाई' झालेली असून 'लाल वळसा घेऊन असा' ती पुढेच जाते. 'संथ निळे हे पाणी' मध्ये "कुरळया लहरीमधून शीळ घालितो वारा." 'उदास संध्याकाळ' मध्ये "वाऱ्याची ही झुळुक लाजरी' अकालीच जणु प्रौढ होते. 'शांत किनारा' मध्ये 'लहरी चुंबीत वारा लहरे'.

एकच वारा तीन निरनिराळ्या मनोवृत्तीत कसे तीन वेगवेगळे विभ्रम दाखवितो पहा. याप्रमाणे पाडगावकरांचा सर्व निसर्गदृश्यांतील काही भावपूर्ण विभ्रम आपण नोंदवून घेऊ.

(१) दूर कमान पुलाची एकलीच अंधारी थरथरत्या पाण्याला कसले गुपित विचारी ! (कविता-संथ निळे हे पाणी)

(२) कोठे एखादा दुसरा होता आकाशात ढग। आणि अंधुकली होती पाण्यातली झगमग (कविता- अशा वेळी)

(३) पानांची ही कुजबुज । दाटे वाऱ्याच्या मनात । कसलेसे गंधगुज (कविता -भार)

(४) झाली आता सांजवेळ । कुरणात सावळयांचा । पाठशिवणीचा खेळ ! (कविता- भार)

(५) भरून काजव्यांनी हा । चमके पिंपळ सारा । स्तिमित होउनी तेथे । अवचित थबके वारा । (कविता- संथ निळे हे पाणी)

(६) उडाला तरळत हलु काजवा । हवेतुन शिरशिरला गारवा । उसासा गंधित टाकुन असा । कुजबुजे वारा गंधर्वसा (कविता- क्षणपुष्पांच्या सरी)

(७) फुलवुनि गात्री इंद्रधनुष्ये । क्षितिज विंधुनी धुंद कटाक्षे । विरघळलेले नवथर उन्मद चंद्रकिरण मी प्याले । (कविता- मी चंचल होऊनि आल्ये)

(८) चिंतनी उभ्या तरूंच्या तळी । गुंफिली छायांनी साखळी । पालवी सळसळली मोकळी । चांदणे हलुच मिसळले जळी. (कविता- क्षणपुष्पांच्या सरी)

(९) दिशांची तरल पापणी मिटे । संथ जळ पुलकफुलांनी नटे । विरहिणी रमणीपरि नच कळे । मेघ का आतुर होउनि वळे ? (कविता- क्षणपुष्पांच्या सरी)

(१०) कुरवाळित येतिल मजला । श्रावणातल्या जलधारा । सळसळून भिजली पाने । मज करितिल सजल इषारा । (मी फूल तृणातिल इवले)

याप्रमाणे काजवा, तारा, मेघ, चांदणे, वारा, लहरी, सावळ्या, तरु, पालवी, दिशा, रंग, गंध, मेघ, काजवा यांचे विविध विभ्रम व विविध भाववृत्ती पाडगावकरांनी चित्रित केल्या आहेत. पाडगावकरांचे विश्व चांदण्याचे आहे; कातरवेळेचे आहे; धुक्याचे, पर्जन्याचे, पहाटेचे, नीरवतेचे आहे. गळबलाटाचे नाही, कर्कशतेचे नाही. ते त्यांनी जिव्हाळयाने व समरसतेने चित्रित केले आहे. त्यांच्या इतक्या प्रामाणिक व सुंदर अनुभूतींचा आविष्कार दुसऱ्या प्रकारे होऊच शकला नसता. अशा सौंदर्यपूर्ण विश्वाची काव्यात अभिव्यक्ती करताना त्यांची भाषा तशाच रूपाने विलसताना दिसते. सृष्टीचे सौंदर्य सादर करताना पाडगावकर निवेदनाची कशी विविधता अनुसरतात त्याचे एक तुलनात्मक उदाहरण पहा-

(१) संथ निळे हे पाणी, आनंदयात्री, क्षणपुष्पांच्या सरी, शांत किनारा, किमया, निवांत, रात्र भिजली, अजून व्हायची जरी पहाट, अशा वेळी, फुंकर, लडक या कवितात निसर्गाची सौंदर्यपूर्ण आल्हाददायक निसर्गचित्रे रेखाटली आहेत.

(२) तेच 'मी चंचल होउनि आल्ये, दर्शन, चिरनूतन, आज जागे आहे मन' या कवितात त्यांनी असे चित्रण केले आहे की त्यांना सृष्टीच्या सुंदर रूपात चैतन्याचा साक्षात्कार होतो आहे. एका कवितेत या चैतन्यतत्त्वाने चंचल स्त्रीचे रूप घेतले आहे. तिने गात्री इंद्रधनुष्ये फुलविली आहेत. आषाढातिल घनापरी किंवा धूसर अंधारातुन पिशापरी चिरवांछित शोधित किंवा ऋतूंचे नजराणे घेऊन विविध रूपे धारण करणारी ही स्त्री आल्याचे ती आपण होऊनच सांगते. (कविता मी चंचल होउनि आल्ये). तर दुसऱ्या एका कवितेत या सौंदर्यरूप चित्तत्त्वाला बोलावतात व त्याने कोणत्या रूपातून यावे आणि कसे यावे हे तेच सांगतात.










जर पहाटेच येणार तर ये धुके होउनी गहन निळे ।
जर येणारच रात्री तर ये तू होउन थरथर पर्णांची ।
जर फुलापरि येणार तरी तृणपुष्प होउनी ये इवले ।

— याप्रमाणे विविध निसर्गाच्या दृश्यातून ते चित्तत्वाला बोलावतात. 'दर्शन' या कवितेत ते म्हणतात, हे सौंदर्यतत्त्वा तुझे मला जिथेतिथे दर्शन होते. तेव्हा मी तुला दर्शन दे असे कधी म्हटलेच नाही.

तुला पाहिले ऋतूऋतूतुन, फुलाफळातुन
त्या गगनातुन, या मातीतुन, स्थितीगतीतुन
संघर्षातुन, सुखदुःखातुन व्यथेव्यथेतुन
या सृष्टीतुन अन् भवतीच्या मानवतेतुन
रे कसे शोधु तुज वेड्यापरि मी तुलाच टाकुन.

— याप्रमाणे ते सौंदर्याचे दर्शन घडवितात. 'आज जागे आहे मन' मध्ये सृष्टीत मन जागे असता सौंदर्यपूर्ण चित्तत्त्वाचा साक्षात्कार कोठे कसा होतो ते पाडगावकर सांगतात. यात जवळजवळ सगळा निसर्ग व निसर्गाची सर्व रूपे वर्णिली आहेत. 'चिरनूतन' या कवितेत त्यांना चैतन्याचे नावीन्य, चिरनावीन्य जाणवते— "मृदुल उन्हाचे रेशीम, रिमझिम श्रावणसरी, फुटणाऱ्या लाटा, हळव्या हिरव्या वाटा, ढगांचे भरलेले कलश, निजलेले बीज, नवा वसंत फेनाचा विस्मय, निळे जळ इ. चिरयौवन, अखंडनूतन निसर्गाच्या दृश्यातून त्यांनी आवाहन केले आहे.

( ३ ) काही कवितांत निसर्गाच्या हृदयांतून पाडगावकरांनी आपल्या भाववृत्ती प्रतिबिंबित केल्या आहेत. आनंदयात्री या कवितेत ती भाववृत्ती उत्फुल्ल आनंदाची आहे.

अफाट आकाश । हिरवी धरती । पुनवेची रात ।
सागरभरती । पाचूंची लकेर । कुरणाच्या ओटी ।
प्रकाशाचा गर्भ । जलवंतीपोटी । अखंड नूतन
मला ही धरित्री । आनंदयात्री मी आनंदयात्री ।

—अशा शब्दांशब्दांतून ते निसर्गाच्या रूपात आपला आनंद मिसळून गात नाचत आहेत, असे वाटते. 'ही उदास संध्याकाळ' मध्ये त्यांची मनोवृत्ती अत्यंत उदास आहे. निसर्गातील प्रत्येक दृश्य त्यांना त्यांच्याचप्रमाणे उदास झालेले भासते व वाचकांचे मन उदासतेने भारून टाकते. पहा —

ही उदास सायंकाळ
खिन्नपणा पांघरून बसला झुरत दूरचा माळ !
असुनीही नसल्यासम पाने
थिजले त्यांच्या मनिचे गाणे
फिकट पांढरी चंद्रकोर उरि जपत बसे आभाळ
संथ तरंगत मेघ एकला
नकळे शोधित काय चालला
अंधाराचे करित ध्यान जणु पर्वत भव्य विशाळ
- - - - - - - - - -
ही वाऱ्याची झुळुक लाजरी
अकालीच जणु प्रौढ जाहली
तिलाच नकळत तिच्या अधरिचे हास्य खट्याळ
- - - - - - - - - -
अंधाराची शामल चाहुल
जळात भिनली ढाळित काजळ
विकट सावल्यांतुन हो जागृत भयभीषण वेताळ
ही उदास सायंकाळ !

'हरवले गीत मिळे' 'भार' 'दुपार एकटी जळे' 'अशावेळी' 'रात्र भिजली' 'निवांत' इत्यादी कवितांत कवीने आपल्या विविध भाववृत्ती निसर्ग-दृश्यातून संक्रांत केल्या आहेत.

केवळ 'जिप्सी' या एका संग्रहातच पाडगावकरांनी अखिल निसर्ग व त्याचे विविध विभ्रम विपुलपणे सादर केले आहेत. ते करताना त्यांनी 'सौंदर्याचे पारदर्शक विश्व' निर्माण केले आहे. पाडगावकरांचे हे सौंदर्यविश्व पुष्कळसे ऐंद्रिय संवेदनाचे आहे.

सृजनाचे स्पंदन होउनि ये
रस–रंग–नाद–गंधातुन तू

अशा प्रकारे 'रस-रंग-नाद-गंधां'चे थवेच्या थवे त्यांच्या मनावर झेपावतात. 'जिप्सी'त विरूपतेचा प्रत्यय व बीभत्सतेचे दर्शन होत नाही. त्यांच्या निसर्गाच्या अनुभवात "चरचरीत वास्तवता" नसून "नाजुक भावकोमलता" आहे. त्या अनुभवात प्रामाणिकपणा व जिव्हाळा ही ओतप्रोत भरलेली आहेत. पाडगावकरांचे हे निसर्गविश्व बालकवींच्या निसर्गविश्वाप्रमाणेच हळवे, नाजुक, मुलायम व स्वप्नाळू आहे. परंतु बालकवींचे बरेचसे निसर्गविश्व त्यांच्या कल्पनेतलेच होते. पाडगावकरांनी गात्रागात्रांतून निसर्ग अनुभवला आहे व शब्दाशब्दांतून तो ओथंबून वाहविला आहे.








३) प्रेमकविता.

'जिप्सी' या कवितासंग्रहात पाडगावकरांची बरीचशी कविता प्रेमकविता आहे. या प्रेमाचे व प्रेमकवितेचे सफल प्रेमाची कविता किंवा विफल प्रेमाची कविता अथवा मीलन की विरह असे विभाग करता येतील असे वाटतही नाही व तशी आवश्यकताही नाही. कारण काव्यनिर्मितीची भाववृत्ती व्यक्त करणारी कविता आणि निसर्गकविता ज्याप्रमाणे सूक्ष्म व मधुर आहेत, त्याचप्रमाणे त्यांची प्रेमकविताही अतिशय मधुर आहे. मधुरता ही पाडगावकरांच्या प्रेमकवितेचा जसा एक विशेष आहे तसाच दुसरा जाणवणारा व इतर कवींपेक्षा वेगळा वाटणारा. त्यांच्या प्रेमकवितेचा विशेष म्हणजे त्यांची प्रेमाची भाववृत्तीही रम्य निसर्गाच्या प्रतिमांतूनच व्यक्त झाली आहे. कदाचित या दुसऱ्या विशेषामुळे त्यांची कविता अधिक मधुर वाटत असावी. मधुरतेचे दुसरे कारण असे असावे की त्यांच्या प्रेमाच्या भावनेत, सात्त्विकता आहे, कोमलता आहे, नाजुकपणा आहे; तडफड, तळमळ, जिवाची उलघाल, संताप, असली तामस भावना नाही. 'जिप्सी'तल्या काही प्रेमकवितांबाबत असे म्हणता येते की ज्याप्रमाणे त्यांची निसर्गकविता निसर्गाचे रम्य व जिवंत शब्दचित्र रेखाटते ( निवांत व खडक ) व त्यातून 'सौंदर्याचे पारदर्शक विश्व' प्रतीत होते त्याचप्रमाणे त्यांच्या काही कविता प्रेमाचे शब्दचित्र उभे करतात व त्यातून 'सौंदर्याचे पारदर्शक विश्व' निर्माण होते. हे सौंदर्यसुद्धा निसर्गप्रतिमांमुळेच निर्माण झाले आहे. बानगीदाखल "क्षणात असल्या" व "तुझी निराळीच तऱ्हा" या दोन कविता संपूर्णच उद्धृत करतो. प्रेयसीच्या सहवासात येणारा सुखानुभव पाडगावकरांनी निसर्गप्रतिमांच्या माध्यमातून किती समर्थपणाने व नाजुकपणाने उभा केला आहे तो 'क्षणात असल्या' या कवितेत पहावयास मिळतो. ती कविता अशीः—

असे भिडावे
नकळत क्षणभर अपुले डोळे
उमलुन यावे
हृदयातिल हितगूज मोकळे.
असाच व्हावा
स्पर्श कधी नवथर ओझरता
अन् उमगावे
जे शब्दांना ये न दाविता.
तू उधळावे
पाकळयातले निर्मळ मार्दव
सदाफुलीपरि
सदा तुझे फुलणारे लाघव.
तुझी गूढता
मध्यरात्रिच्या आकाशापरि
पटवित ओळख
पसरत यावी स्निग्ध अंतरी
ठाउक मजला
वाटहि कधितरि तमात बुडते
झुळझुळणारे
गीत अधरिचे अवचित थिजते
कुणी करावी
गहन उद्यांची खंत आज पण
क्षणात असल्या
शाश्वतिचे जर नवे निमंत्रण
जाणिवेत तू
चमक होउनी गडे चांदणी
अशीच अविरत
शुभ्र क्षणांची करित सांडणी.

— या कवितेतल्या "तू उधळावे पाकळयातले निर्मल मार्दव । सदाफुलीपरि सदा तुझे फुलणारे लाघव । तुझी गूढता । मध्यरात्रिच्या आकाशापरि" या ओळी व "जाणिवेत तू चमक होउनी गडे चांदणी । अशीच अविरत शुभ्र क्षणांची करित सांडणी" या ओळी प्रेमाचा शुभ्र मृदुल अनुभव जाणवून देतात. "तुझी निराळीच तऱ्हा" या कवितेतही पाडगावकरांनी प्रेयसीशी बोलताना रम्य निसर्गाचे माध्यमच वापरले आहे. या कवितेचे दोन भाग आहेत. एका भागात ते प्रेयसीने आपले मन भडकपणाने वेधले नाही असे सांगतात तर दुसऱ्या भागात ते तिने सौम्य रंगगंधाने कसे बांधून घेतले ते सांगतात. हे दोन्ही करताना त्यांनी रम्य निसर्गाचाच आधार घेतला आहे. तुझा माझ्यावरील प्रभाव कसा नाही ? — पाडगावकर लिहितात—

विजेपरी चमकून
तू न जिंकलेस मन
दिपवून भुलवून








लाटांपरी भरतीच्या
बुडविलेस न कधी
मत्त वेगात प्रीतीच्या
नाही तुझ्या बोलण्यात
धुंद पुनवेची रात
चांदण्यांची बरसात
नित्य नवा आविष्कार
फुलविलास न कधी
ज्यात शब्दांचा शृंगार

— मग तिचा प्रभाव कसा हळुवारपणे पडला ? पाडगावकर सांगतात—

सांगितलेस गुपित
पहाटेच्या दवापरी
हळु तृणांच्या कानात,
कळीपरी नकळत
पानाआड दडूनच
फुललीस अवचित,
गाढ एकांताच्या मनी
शहारलीस होऊन
स्निग्ध लाजरी चांदणी.

—आपल्या प्रेयसीची "निराळीच तऱ्हा" कशी आहे ते शब्दचित्र निसर्गाच्या प्रतिमेतून अलंकरणाच्या रूपात पाडगावकरांनी असे चित्रित केले आहे. 'आज' या कवितेत निसर्गाच्या साहाय्याने एक वेगळाच प्रेमानुभव पाडगावकरांनी अत्यंत काव्यात्म करून दाखविला आहे. हा काव्यात्म अनुभव त्यांच्याच शब्दात सांगावयाचा तर असा आहे—

" आज तुझ्या रूपातून
झाला अरूपाचा भास
उरी पहाटे आधीच
जाग आली प्रकाशास."

— पहाट होण्यापूर्वीच प्रकाशाला जाग आली व ती पत्नीच्या मुखकमलावर विलसू लागली. तिच्या रूपातून अरूपाचा भास झाला.

"हे सर्व कवीला कसे जाणवले ? तर त्याला तिच्या लोचनात आकाश दिसले, तिचे श्वास गूढ निरोप घेऊन आले. तिच्या स्पर्शात काही निराळयाच खुणा जाणवल्या." मग निसर्गाच्या प्रतिमातून पाडगावकर सांगतात—

आज तुझिया बोलात
सीमा सरून शब्दांची
नकळत उमलली
पहाट ही निःशब्दाची
आज निराळेच भासे
तुझ्या अधरींचे स्मित
लकेरच चांदण्याची
जणुं भिजली दवात

— याप्रमाणे पाडगावकर निसर्गाच्या प्रतिमांतून आपले प्रेमानुभव व्यक्त करतात. तो निसर्ग रम्य असतो व अनुभव सोज्वळ असतो. त्यामुळे पाडगावकरांची प्रेमकविता अतीव मधुर वाटते.

पाडगावकर आपले अनुभव सांगताना निवेदनाची पद्धत सुद्धा अत्यंत नावीन्यपूर्ण वापरतात 'आज' या वरील कवितेतच पत्नीच्या गर्भवतीपदाची सूचना अशी देतात—

" आज तुझ्या पावलात
झाले भविष्य चकित
फलभारे जड झाला
निळा सोनेरी एकांत "

" विस्मरण संपले-मीलन झाले " हे सांगताना ते लिहितात " विस्मरणाचे दान तुझे ते सरले आज। आठवणींचा घेउन आलिस सुंदर साज. "

या नवीन निवेदनपद्धतीतही मधून मधून निसर्ग-प्रतिमा डोकावतेच व ती वातावरण अतिशय रम्य व मधुर बनवते. उदा. पहाः—

लकब तुझी ही काहि निराळी
शब्दांवर मौनाची जाळी
विरक्तीत शिशिराच्या दडला पण ऋतुराज.
आठवणींचा घेउनि आलिस सुंदर साज.

वा. ल. कुलकर्णी म्हणतात त्याप्रमाणे पाडगावकरांच्या प्रेमकवितेतून आपणांस " प्रेमभावाच्या विविध छटांचे आणि वृत्तींचे ( moods चे ) हळुवार दर्शन होते. मीलनाचा अत्यंत धुंद क्षण व्यक्त करताना ते जवळपणाचेच बंधन झाल्याचे सांगतात. या अनुभवांतील तृप्ती त्यांनी व्यक्त केली आहे ते पहा—

भरून राहिलिस तूच माझिया नेत्रामधुनी
निद्रेमधुनि, स्वप्नामधुनी, जागृतीतुनी












कळले आता असून डोळे नव्हती दृष्टी नव्हते दर्शन
इतुके आलो जवळजवळ की जवळपणाचे झाले बंधन.

ह्या कवितेत " जवळपणाचेच बंधन झाल्यांची " व्यथा आहे. कारण त्याच्या मते– " मीलन कसले ? जे न बघू दे दिशा मोकळया. " म्हणून त्याने प्रेयसीजवळ अगदी काव्यमय शब्दात मागणी केली आहे–

निकट असुनिही श्वासापुरते दूर असावे
जवळपणातहि पंखांना आकाश दिसावे...
जवळ जवळ ये, पण सीमेचे भान असू दे
रात्र असो, पण पहाटही वेगळी दिसू दे.
स्वरजुळणीतुनि एक गीत– तरी हवेच अंतर सात सुरांतून.

यातील व्यथा ' जवळपणाची ' आहे तर ' व्यथा ' कवितेतील व्यथा विरहाची, पश्चात्तापाची, प्रेमातल्या भांडणाची आहे. त्या व्यथेत हुरहूर आहे. आणि विशेष म्हणजे कमालीची सचोटी ( sincerity ) आहे. प्रियकराशी भांडण झाले. शब्द अग्नीप्रमाणे धगधगले. त्याला घराबाहेर काढून दार लावून घेतले. पण नंतर " ओसरला अवचित कलह मनातिल सारा अन् विरला क्षणि त्या अभिमानाचा पारा " मग ती उठली व तिने दार उघडले. बाहेर तोच उभा होता. तिने त्याचाच आधार घेतला. तरीसुद्धा तिच्यात सचोटी आहे. ती अशी :–

ही व्यथा मनीची मौनातच साकळली
का असेल तुजला अश्रुतुन आकळली ?
मी नाहि बोलले ... नाहि जाहला धीर...
वेदना उरींची उरीच रे कळवळली.
अजुनीहि तरी कधि एकांती तळमळते
तळमळते, जळते आणि स्वतःशी म्हणते
तुज कधीच नाही कळले, नाही कळले
माझेपण विसरून किती किती तळमळले.

–ही सचोटी ही या कवितेतले खरे सौंदर्य आहे. ' पांघरूण ' या कवितेतही अशीच एक व्यथा आहे. तो वासनेने धुंद होऊन तिच्याजवळ आला. याचा तिला राग आला व तिने त्याला दूर लोटले. मग तिला त्याचे अस्तित्वच जाणवले नाही. पहाटे पाहिले तर त्याने तिच्या अंगावर पांघरूण घातले होते. भांडणातही प्रेम टिकून राहते. हा अनुभव तिने निसर्गाच्या प्रतिमेतून असा व्यक्त केला आहे.

बाहेर येउनि ओटीवर क्षण उभी राहिले !
मोगरा बहरला होता लाख फुलांनी
जणु गंधित नक्षत्रांनी !!
अंधार सुगंधित होउनि
थरथरत–– शहारत होता
मनापरि जणु माझ्या !!

" दुपार एकटीजळे " या कवितेत " निशेउषेच्या सौंदर्यी, गडे तुझी माझी मिठी जुळे पण ज्वालांच्या धगीत माझी दुपार एकटी जळे ! " अशी भावना व्यक्त झाली आहे. " गहन तुझ्या डोळयात खोल बुडताना " नकळत ' माझेपण ' कसे परके होते. ते व्यक्त झाले आहे.

" प्रेमाची मन व्यापून टाकण्याची शक्ती, त्याचा जोश, त्याने निर्माण होणारी हुर्हूर, त्याची अबोधता, मुग्ध आणि विमुक्त ह्या दोन्ही वृत्तींचा प्रेमाच्या राज्यात येणारा सुखद अनुभव, त्याची शारीर बाजू व तिच्याशी संलग्न असणारे विविध अनुभव ह्यांत सामावलेले भावसौंदर्य " ह्या सर्व गोष्टींचा प्रत्यय पाडगावकरांच्या प्रेमकवितेत येतो व निसर्गकविता व काव्यनिर्मिति-प्रक्रियाविषयक कवितेप्रमाणेच त्याही कवितांत सौंदर्य चित्रित होते.








लो. बा. गं. टिळक

# महात्मा गांधी

## ( महात्मा गांधींच्या चरित्राची लो. टिळककृत प्रस्तावना )

गेल्या सालीं म्हणजे १९१७ च्या डिसेंबर महिन्यांत कलकत्त्यास कॉंग्रेस सभेस गेलों असतांना तेथें सौ. अवंतिकाबाई गोखले ह्यांनीं आपण महात्मा गांधींचें चरित्र लिहीत असल्याचें मला कळविलें व त्यास प्रस्तावना लिहिण्यास मला विनंति केली. ही विनंति अर्थातच मला अमान्य करवेना. पण त्या वेळीं हें पुस्तक इतक्या लवकर तयार होईल अशी मला कल्पना नव्हती. विशेषतः मी विलायतेस जाण्यास निघालों असतां त्या ग्रंथास प्रस्तावना लिहिण्याचें काम घाईघाईनें उरकावें लागेल असें तर त्या वेळेस मला मुळींच वाटलें नव्हतें. पण आतां तशी स्थिति आल्यामुळें ही प्रस्तावना कशी बशी तरी पुरी करावी लागत आहे. महात्मा गांधींच्या चरित्रास प्रस्तावना लिहिण्यास अधिक चांगली वेळ व फुरसत पाहिजे होती. ती मिळाली नाहीं याबद्दल मला वाईट वाटतें. तथापि " अकरणान्मंदकरणं श्रेयः " ह्या न्यायानें मी तें काम करीत आहें. आणि या ग्रंथाचे वाचक वरील हकीकत लक्षांत आणून त्याबद्दल मला माफी करतील अशी आशा आहे.

महात्मा गांधी यांचें नांव हिंदुस्तानांत कोणास माहिती नाहीं असें नाहीं. अर्थात् त्यांच्याबद्दल थोडी-बहुत माहिती करून घेण्याची इच्छाहि सर्व लोकांस झालेली आहे असें म्हटलें तरी चालेल. परंतु ही इच्छा पूर्ण होण्यास मराठी भाषेंत आजपर्यंत कोणताच ग्रंथ झालेला नव्हता. ती उणीव सौ. अवंतिकाबाई यांनीं प्रस्तुतचा सोपा ग्रंथ लिहून भरून काढली याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करितों. सौ. अवंतिकाबाई म्हणतात त्याप्रमाणें महात्मा गांधी यांचें चरित्र अद्याप वाढतें आहे. आणि ह्याच विषयावर नवा ग्रंथ लिहिणारास नवी माहिती मिळण्यासारखी आहे. म्हणून हल्लींच्या ग्रंथानें पुढील लेखकांस कोणत्याहि प्रकारचा अडथळा न येतां उलट त्या कार्याची प्रस्तावना करून ह्या कट्ट्या देशभक्ताच्या चरित्राची महाराष्ट्र वाचकांस ओळख करून देण्याची कामगिरी बजावल्याचें श्रेय मात्र सौ. अवंतिकाबाईस मिळणार आहे. सौ. अवंतिकाबाई ह्या हल्लीं चंपारण्यांत महात्मा गांधी ह्यांस मदत करण्यासाठीं व त्यांच्या हाताखालीं राहून काम करण्यासाठीं गेलेल्या आहेत. तेव्हां केवळ पुस्तकावरूनच नव्हे, तर प्रत्यक्ष अवलोकनानेंहि त्यांच्या चरित्रनायकाचे विचार, आचार, स्वभाव, राहणी, अनेक विषयांवरील त्यांचीं मतें, त्यांच्या कुटुंबांतील माणसांशीं किंवा इतरांशीं त्यांचें वर्तन, यांचा त्यांना पुरा परिचय झालेला आहे. ग्रंथ लिहिण्याच्या कामीं ह्या प्रत्यक्ष अवलोकनाचा पुष्कळ उपयोग झालेला आहे असें वाचकांस सहज दिसून येईल.

महात्मा गांधी यांचें चरित्र बोधप्रद आणि अनुकरणीय कां व्हावें याचीं कारणें शोधून काढण्यास माझ्या मतें फारसे परिश्रम नको आहेत. गांधी हे ज्याप्रमाणें विलायतेहून बॅरिस्टरची परीक्षा पास होऊन आलेले आहेत त्याप्रमाणें बॅरिस्टर झालेले पुष्कळ लोक आहेत. त्यांचे वडील दिवाणगिरीच्या कामावर होते तसेहि पुष्कळांचे असतील. किंवा ह्यांचा स्वभाव जसा साधा व सरळ आहे तसा इतरांचाहि असेल. त्यांत कांहीं विशेष नाहीं. इंग्रजी विद्येचा ह्या देशांत प्रचार झाल्यापासून निष्णात झालेले पुष्कळ लोक हिंदुस्तानांतील विश्वविद्यालयांतून बाहेर पडलेले आहेत. जगाचा इतिहास किंवा भूगोल सांगोपांग माहित असणें, अथवा एकाद्या शास्त्रीय विषयावरील माहिती बिनचुक सांगणें, हीं कामें केवळ बुद्धिगम्य असल्यामुळें तीं आमच्यापैकीं पुष्कळ बुद्धिवान् लोकांनीं गेल्या शेंदीडशें वर्षांत उत्तम रीतीनें करून दाखविलीं आहेत. तसेंच पाश्चात्य विचार, पाश्चात्य सामाजिक पद्धति, पाश्चात्य समजुती, किंवा समाजरचना इत्यादि गोष्टींबद्दलहि बौद्धिक किंवा








तार्किक विचार करण्यांत आमच्या सुशिक्षित वर्गानें आपली बुद्धिमत्ता चांगल्या प्रकारें व्यक्त केली आहे. परंतु शील किंवा चारित्र्य–ज्यामुळें या कर्ममय भूमींत मनुष्याची सभोंवतालच्या वस्तुस्थितीवर सत्ता चालूं शकते, आणि ज्यामुळें निरनिराळ्या गोष्टींबद्दल केलेल्या प्रयत्नास सिद्धि प्राप्त होण्याचा संभव उत्पन्न होतो तें शील व चारित्र्य ज्या उदाहरणावरून आपल्या प्रत्यक्ष निदर्शनाला येईल अशीं चरित्रें आमच्याकडे फारच कमी दृष्टोत्पत्तीस येतात. गांधींच्या चरित्राचें जें कांहीं वैशिष्ट्य आहे तें हेंच होय. त्यांच्या सामाजिक, धार्मिक, राजकीय किंवा इतर मतांपैकीं कांहीं मतें कितीएकांस कदाचित् पसंत होणार नाहींत. विद्वत्तेनें त्यांना मागें टाकणारे दुसरे पुष्कळ गृहस्थ असतील, पण शीलचारित्र्याची जी महती वर सांगितली त्या दृष्टीनें विचार केला असतां महात्मा गांधी यांचें चरित्र खरोखरच सामान्य मनुष्यास आदर्शभूत होण्यासारखें आहे, ह्याबद्दल कांहीं मतभेद असेल किंवा होईल असें आम्हांस वाटत नाहीं. आणि म्हणूनच मराठी भाषेंत झालेल्या ह्यांच्या प्रस्तुतच्या चरित्राचा महाराष्ट्रांतील लोकांनीं नीट अभ्यास करावा अशी आमची त्यांस शिफारस आहे.

हिंदुस्तानांतील लोक, मग ते हिंदुस्तानांत रहाणारे असोत किंवा इंग्रजी साम्राज्याच्या इतर भागांत राहणारे असोत, चोहोंकडे विपन्न स्थितींत आहेत याबद्दल कांहीं शंका नाहीं. तसेंच, ही विपन्नावस्था कां आली, पूर्वींच्या स्थितींत कोणतें अंतर पडलें, हें अंतर न पडण्यास काय केलें पाहिजे इत्यादि गोष्टींची पुष्कळ चर्चा झाली असल्यामुळें त्याबद्दल या लहानशा प्रस्तावनेंत आम्हीं कांहीं लिहूं इच्छित नाहीं. किंबहुना महात्मा गांधी यांच्या चरित्रापासून जो बोध घ्यावयाचा त्याचा हा महत्त्वाचा भाग नाहीं अशी आमची समजूत आहे. व्यक्तीच्या संसारांत काय, किंवा देशाच्या संसारांत काय, परिस्थिति ही प्रायः पूर्व पिढीच्या किंवा पूर्वकालीन कर्माच्या परिपाकानें निर्माण झालेली असते. ही स्थिति वाईट असल्यास त्याचा दोष त्या स्थितींत राहणाऱ्या मनुष्याकडे देतां येत नाहीं, हें खरें आहे. पण ती जर वाईट असेल तर तिच्या कारणांचा योग्य ऊहापोह करून व ती दूर करण्यास कोणते उपाय केले पाहिजेत, ह्याचा शक्य तितका खोल विचाराअंतीं निर्णय करून तो निर्णय अमलांत आणण्याचें काम म्हणजे अर्थात् ती स्थिति सुधारण्याचें काम, जर सदर स्थितींत सांपडलेला पुरुष– विशेषतः देशांतील कर्ता पुरुष करणार नाहीं तर मात्र तो आपल्या कर्तव्यास जागला नाहीं असें म्हणावें लागेल. कारण परिस्थिति उत्पन्न होण्यास जरी आपण कारणीभूत नसलों तरी ती सुधारण्यास आपल्या हातून शक्य तेवढे प्रयत्न करणें हें प्रत्येक मनुष्याचें व्यक्तिदृष्ट्या आणि सार्वजनिक दृष्ट्या कर्तव्य आहे, पवित्र कर्तव्य आहे, असा शास्त्राचा आणि धर्माचाहि सिद्धांत आहे. ज्या योगानें जगाचें धारण पोषण होतें त्याला धर्म असें म्हणतात. आणि जगाचें धारणपोषण म्हटलें म्हणजे त्यांत सद्यःकालीन परिस्थिति सुधारून ज्या योगें ती परिस्थिति वरच्या वरच्या पायरीला जाऊन अखेर पूर्णावस्थेला पोंचेल त्या त्या सर्व गोष्टी करणें, करविणें, स्वतः करणें आणि लोकांकडून करविणें याचा प्राधान्येंकरून समावेश होतो. आपला जन्म कोणत्याहि देशांत झालेला असो, तो केवळ आपण त्या देशांतील अन्न खाऊन आमरणांत आपल्या बायका मुलांसह चैनींत राहण्यासाठीं नाहीं, या पेक्षां कांहीं तरी उच्चतर ध्येय सिद्ध करण्याकरितां आहे, ही गोष्ट शास्त्रकार आणि धर्मकार या दोहोंसहि पूर्णपणें मान्य आहे. या उच्चतर ध्येयाची मर्यादा इतकी श्रेष्ठ आहे कीं, मनुष्य या मार्गानें जातां जातां अखेर त्याला ह्या जगाचें पालन पोषण करणाऱ्या परमेश्वराचें तादात्म्य प्राप्त होतें म्हणजे तो देवपणा पावतो, असें शास्त्रांतून वर्णन आहे. परंतु शास्त्र आणि धर्म या दोहोंच्याहि आज्ञा जरी अशा प्रकारच्या आहेत तरी ह्या ध्येयाकडे आमच्या देशांतील लोकांचें जितकें लक्ष्य लागावें तितकें लागलें नव्हतें असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें. एरवीं सध्याची परिस्थितिच उत्पन्न झाली नसती. पण पूर्वकालीं ह्या गोष्टीकडे देशांतील कर्त्या पुरुषांचें जावें तितकें लक्ष्य गेलें नाहीं म्हणून प्रस्तुत कालीं आम्हींहि तो मार्ग स्वीकारूं नये असें होत नाहीं. देशाच्या उन्नतीसाठीं जे कांहीं प्रयत्न करावयाचे त्याला कालाची कांहीं विशिष्ट मर्यादा असते असें नाहीं. पूर्वींच्यांनीं असे प्रयत्न केले नसले तर पुढच्या लोकांनीं करूं नयेत असें नाहीं. आज केले नाहींत तर उद्यां करूं नयेत असें नाहीं. आणि उद्यां केले नाहींत तर








परवां करूं नयेत असेंहि होत नाहीं. अशा तऱ्हेचे प्रयत्न करणें हें आपलें कर्तव्य आहे. आणि ही कर्तव्य-जागृति ज्याच्या मनांत ज्या ज्या क्षणीं होईल त्या त्या क्षणीं त्यानें हें आपलें कर्तव्य बजावण्यास निरलसपणानें स्वार्थत्याग करून आणि आपणावर किंवा आपल्या कुटुंबावर संकटें येणार किंवा येतील याची पर्वा न करितां परमेश्वरावर भरंवसा ठेवून निष्काम बुद्धीनें लागलें पाहिजे हा ह्यांतील सारभूत सिद्धांत आहे. म. गांधींच्या चरित्रावरून जो कांहीं बोध घ्यावयाचा त्यापैकीं मुख्य बोध हा होय.

अलीकडे दुसरी एक अशी समजूत होत चालली आहे कीं हिंदुस्थान देशाची स्थिति सुधारण्यास प्रथमतः हिंदी समाजाची स्थिति सुधारली पाहिजे आणि ही सुधारेल तेव्हां मग पुढें राजकीय गोष्टींचा विचार करण्याची वेळ येईल. महात्मा गांधी यांच्या चरित्रावरून वरील मत किती अयथार्थ आहे हें वाचकांस सहज कळून येणार आहे. देशांतील सर्व कांहीं सुधारणा घडवून आणण्यास " सर्वारंभास्तण्डुलाः प्रस्थमूलाः " या न्यायानें त्या देशांतील सत्ता, पूर्ण नाहीं तरी बऱ्याच अंशानें, देशांतील कर्त्या आणि विचारी पुरुषांच्या हातांत असावी लागते. सत्तेशिवाय शहाणपण फुकट जातें इतकेंच नव्हे तर कर्तृत्वहि निर्माल्यवत् होतें. म्हणून देशाची स्थिति सुधारण्याचे जे प्रयत्न करावयाचे ते विशेषेंकरून प्रथमतः ह्या सर्व सुधारणांना अवश्य लागणाऱ्या मूलभूत बाबतींतच झाले पाहिजेत. महात्मा गांधींचें असें मत नसतें तर ते राजकीय सुधारणेंत बिलकुल पडले नसते. आफ्रिकेंतील वसाहतींत गेलेल्या हिंदी मजुरांच्या कल्याणार्थ त्यांनीं जे प्रयत्न केले ते केवळ सामाजिकच होते असें नाहीं, आफ्रिकेंतील राज्यव्यवस्थेशीं त्यांचा प्रत्यक्ष संबंध होता. किंबहुना आफ्रिकेंतील जुलमी राज्यव्यवस्थेमुळेंच तेथील हिंदी मजुरांवर हा प्रसंग ओढवलेला होता असें म्हटलें तरी चालेल. ह्याचा गांधी यांच्या मनावर स्वभावतःच असा परिणाम झाला कीं राज्यव्यवस्थेंत सुधारणा झाल्याखेरीज आफ्रिकेंतील हिंदी लोकांची स्थिति सुधारावयाची नाहीं. इंग्रजी साम्राज्याचे जर आम्ही भागीदार आहों तर ह्या साम्राज्यांत गोऱ्या प्रजेस जे हक्क आहेत तेच हिंदी प्रजेसहि असले पाहिजेत हें न्यायदृष्ट्या अगदीं उघड आहे. पण गोऱ्या लोकांच्या आज ज्या वसाहती झालेल्या आहेत त्या वसाहतवाल्यांनीं केवळ आपल्याच फायद्याकरितां केल्या अशी स्वार्थमूलक समजूत असल्यामुळें साम्राज्याच्या इतर भागांतील लोकांस समबुद्धीनें वागवण्यास ते तयार नाहींत. तथापि बाहेरच्या देशांतील लोक त्यांस अगदींच नको आहेत असेंहि नाहीं. कारण वसाहतींत जमीन किंवा खनिज द्रव्यें मुबलक असून ह्या संपत्तीचा पूर्ण उपयोग करण्यास वसाहतवाल्यांजवळ पुरेसें मनुष्यबळ नाहीं. हजार पांचशें किंवा दोन चार हजार गोरे वसाहतवाले दोहोंच्या ऐवजीं चार चार हातांनीं जरी काम करूं लागले किंवा सहस्र बाहूंच्या शक्तीचीं कितीहि यंत्रें त्यांनीं उपयोगांत आणिलीं तरी वसाहतींतल्या मुलुखापासून द्रव्यदृष्ट्या जितका फायदा होणें शक्य होतें किंवा आहे त्याच्या शतांश देखील फायदा ह्या वसाहतवाल्यांस होणार नाहीं. तेव्हां आफ्रिकेंत मागें नीग्रो लोकांस ज्या प्रमाणें ते वागवीत होते त्याचप्रमाणें हिंदुस्तानांतील काळ्या लोकांस मजूर म्हणून तेथें नेऊन केवळ पशूंप्रमाणें त्यास वागविणेची आणि त्यांच्या उद्योगावर आपण समृद्ध होण्याची वसाहतवाल्यांनी कल्पना काढली. आणि आमच्या हिंदुस्तानांतील नोकरशाही, वसाहतवाल्यांच्या बांधवांचीच असल्यामुळें वसाहतींतील हिंदी मजुरांच्या शोचनीय स्थितीकडे हिंदुस्थान सरकारचें जावें तितकें लक्ष गेलें नाहीं. ही शोचनीय स्थिति हिंदुस्तानांतील पुढारी लोकांच्या लक्षांत येऊन गेल्यास पुष्कळ वर्षें झालीं, पण गांधी सारखे पुरुष पुढें येईपर्यंत तिचें अल्प देखील निवारण झालें नाहीं. समजलें होतें पण उमजलें नव्हतें. आणि उमजलें तरी करवत नव्हतें असा प्रकार होता. या कुचंब्यांतून लोकांना बाहेर काढून गांधींनीं आपल्या उदाहरणानें सुधारणेचा मार्ग दाखविला, असें पुढील चरित्रावरून कोणासहि कळून येईल. आफ्रिकेंतील हिंदी लोकांस त्यांच्या विपन्नावस्थेंतून सोडविण्यास गांधी यांनीं काय केलें याचेंहि जरा सूक्ष्म रीत्या अवलोकन केलें पाहिजे. एकाद्या ठिकाणची राज्यव्यवस्था अन्यायाची असली तर ती सुधारण्याचा प्रयत्न करणें हा कांहीं न्यायदृष्ट्या राजद्रोह होऊं शकत नाहीं. ह्याला राजद्रोह म्हणणें हें राज्यकर्त्यांस न्याय नको, नीति नको, अन्यायाचा प्रतिकार करावयास नको, आपल्या प्रजेस समतेचे हक्क








घ्यावयास नकोत, असें म्हणण्यासारखें आहे. आम्ही असें समजतों कीं प्रजेचें कल्याण हेंच राज्यसत्तेचें खरें ध्येय व सामर्थ्य आहे. हा सिद्धांत एकदां पतकरला म्हणजे मग ज्या ठिकाणीं अन्याय आहे तेथें त्याचा प्रतिकार करून तो दूर करणें म्हणजे एक प्रकारें राज्यसत्तेच्या ध्येयाची अम्मलबजावणी करण्यास मदत करणें होय असा त्यापासून सहजच दुसरा सिद्धांत निघतो. पण पूर्वसंचितामुळें आलेले दुराग्रह अगर स्वार्थबुद्धी यांमुळें प्रजाजनांपैकीं कांहीं विशिष्ट व्यक्ति, जाति किंवा वर्ग कधीं कधीं इतके पछाडले जातात कीं त्यांना हीं न्यायाचीं तत्त्वें दिसेनाशीं होतात अर्थात् अशा वर्गाचा इतर लोकांवर एक प्रकारें जुलूम होऊं लागतो. अशा वेळीं राज्यकर्त्यांनीं त्यांत एकदम हात घालून अन्यायाच्या गोष्टी बंद केल्यास ह्या दुराग्रही व स्वार्थी पण परंपरागत वजनानें प्रतिष्ठित बनलेल्या वर्गास दुखवावें लागतें व त्यामुळें शांततेची चालत आलेली घडी विस्कळीत होते. यास्तव अशा प्रकारच्या स्थितींत ज्यांच्यावर जुलुम होतो त्यांच्याकडून निकराचे प्रयत्न झाल्याखेरीज राज्यकर्ते प्रायः त्यांत मन घालित नाहींत. सारांश, चालतें मूल ज्याप्रमाणें कोणीहि कडवर घेत नाहींत, ठेच लागून पडेल तर गोष्ट निराळी, अशांतलाच प्रकार राजकीय बाबतींतहि घडून येतो. जोपर्यंत राज्यकारभार चालण्यांत कांहीं अडथळा येत नाहीं तोपर्यंत राज्याचीं सूत्रें चालवणाऱ्या लोकांनीं तरी तिकडे काय म्हणून लक्ष द्यावें ? मनुष्यस्वभावच असा आहे कीं, चालत्या गोष्टींत विनाकारण कोणीं ढवळाढवळ करूं इच्छित नाहीं. त्यापासून दुष्परिणाम होतात असें प्रत्यक्ष अनुभवास येईल इतकेंच नाहीं तर त्यामुळें अडेल तेव्हांच कोणीहि मुत्सद्दी मनुष्य त्यांत सुधारणा करण्यास प्रवृत्त होत असतो, एरवीं नाहीं. अर्थात् प्रजेच्या दुःखाची किंवा गाऱ्हाण्यांची किंवा त्यांवर होणाऱ्या जुलमाची स्थिति अशा मजलेपर्यंत आणून ठेवणें आणि शेवटीं राज्यकर्त्यांकडूनच ती सुधारणा घडवून आणणें हें प्रत्येक देशभक्ताचें हरएक प्रसंगीं कर्तव्य आहे आणि हें कर्तव्य गांधी यांनीं उत्तम प्रकारें बजावलें यामुळेंच ते सर्व लोकांच्या स्तुतीस व आदरास पात्र झालेले आहेत.

परंतु गांधींच्या ह्या अडवणुकीच्या मार्गाचें खरें रहस्य सांगण्यास आणखीहि दोन शब्द सांगितले पाहिजेत. देशांत शांतता राखण्यासाठीं जे कायदे केलेले असतात त्यांत राज्यकर्त्या अमलदारांशीं दांडगाई करणें अगर त्यांचा हुकूम तोडून बंड करणें ह्या गोष्टी कितीहि सद्बुद्धीनें केलेल्या असल्या तरी स्वभावतःच बेकायदेशीर मानल्या जातात. अशावेळीं ज्या देशभक्तास आपली इच्छित सुधारणा कायदेशीर रीतीनें अमलांत आणावयाची असेल त्याच्या मार्गांत अनेक अडचणी उत्पन्न होतात; मन जळत असतें; सुधारणा करण्याची उत्कट इच्छा असते; कायद्याच्या मर्यादेचें उल्लंघन करणें गैरशिस्त होय अशी खात्री असते पण उपाय सुचत नाहीं. गांधी यांनीं स्वीकारलेला निःशस्त्र प्रतिकाराचा, अडवणुकीचा किंवा त्यांच्या भाषेंत बोलावयाचें तर सत्याग्रहाचा मार्ग अशा प्रकारच्या अडचणींतच त्यांस सुचलेला असून त्यांनीं अनेक अडचणी सोसून त्या मार्गाचा अवलंब केल्यामुळें तो आतां शास्त्रपूत झाला आहे. हा मार्ग सर्व प्रसंगीं, सर्व कालीं अवलंबिण्यासारखा असला तरी तो हरएक प्रसंगीं उपयोगांत आणावा किंवा नाहीं अगर सर्व प्रसंगीं तितकाच फलद्रूप होईल किंवा नाहीं हें निश्चयानें सांगणें कठीण आहे. तथापि त्या मार्गाची योग्यता मोठी आहे, हें सर्वांस कबूल करावें लागेल. राजानें केलेल्या कायद्याप्रमाणें सर्व प्रजेनें वागावें म्हणूनच प्रत्येक कायद्याच्या मागें तो उल्लंघन करणारांस शासन सांगितलें असतें. हें शासन प्रायः अशा प्रकारचें असतें कीं त्यामुळें मनुष्यमात्राची प्रवृत्ति नीतीनें वागण्याकडे व्हावी. नीतीचा मार्ग सुखाचा, समाधानाचा, आणि शांततेचा असतो. आणि त्या मार्गानें जाण्याच्या नैसर्गिक प्रवृत्तींत जर स्वार्थामुळें थोडी चलबिचल होण्याचा संभव असला तर हें कायद्याचें शासन ती चलबिचल काढून टाकून मनुष्याची सन्मार्गाकडे असलेली स्वाभाविक निष्ठा दृढ करण्यास कारणीभूत होते. पण त्याच्या उलट स्थितींत म्हणजे जेव्हां कायद्यानें ठरविलेली मर्यादा धर्ममूलक अगर न्यायमूलक नसून केवळ कायद्यांत सांगितलेल्या शासनामुळेंच ती अमलांत यावी असा प्रचलित कायद्यांचा परिणाम होऊं लागतो, तेव्हां कायद्यानें दिलेलें शासन भोगून धर्मतत्त्वावरची किंवा न्यायतत्त्वावरची आपली सत्यनिष्ठा कसोटीला लावावी अथवा कृत्रिम कायद्यांतील शासनाच्या भीतीनें ईश्वरनिर्मित न्यायतत्त्वाचा अव्हेर










करण्यास प्रवृत्त व्हावें असा शहाण्यासुरत्या मनुष्याच्या डोळ्या पुढेंहि एक महत्वाचा प्रश्न उभा राहतो. सत्यनिष्ठ आणि न्यायनिष्ठ माणसें कायद्याचा कृत्रिम निर्बंध अशा वेळीं पाळणें युक्त नाहीं असें सांगतात. पण हें सांगणें अमलांत येण्यास सत्यावरील व न्यायावरील निष्ठा इतकी तीव्र असावी लागते कीं स्वतःच्या किंवा आपल्या बायकामुलांच्या सुखासुखाचा, बलाबलतेचा विचारहि मनांत न आणतां मनुष्य आपलें कर्तव्य करण्यास झटदिशीं प्रवृत्त होईल. ज्याला मानसिक धैर्य, खरी सत्यनिष्ठा किंवा सात्विक शील आणि दानत म्हणतात तें हेंच होय. हा गुण केवळ विद्वत्तेनें येत नाहीं. केवळ चांगल्या कुलांत उत्पन्न झाल्यानें येत नाहीं. आणि केवळ बुद्धिमत्तेनेंहि येत नाहीं. खरें आत्मबल हेंच होय. आणि उपनिषदांतील "नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन" हें तत्त्व नीट लक्षांत ठेविलें पाहिजे.

पण अशा प्रकारचें आत्मबल नुसत्या विद्वत्तेनें अगर बुद्धिमत्तेनें प्राप्त होण्यासारखें नसून तें नैसर्गिकच पाहिजे हा सिद्धांत जरी खरा असला तरी निश्चयी मनुष्यास हा गुण गीतेंत म्हटल्याप्रमाणें अभ्यास आणि वैराग्य यांच्या योगानें क्रमाक्रमानें नेहमींच प्राप्त होण्यासारखा असतो, हेंहि विसरतां कामा नये. थोर व उदार पुरुषांचीं चरित्रें शीलचारित्र्यवर्धनास उपयोगी पडतात त्यांतील बीज हेंच होय. ज्याचा स्वभाव निसर्गतःच सात्विक असतो त्याला आपल्या नैसर्गिक स्वभावाची पूर्ण ओळख पटण्यास, किंवा त्यांची पूर्ण वाढ करण्यास थोर पुरुषांच्या चरित्रानें वाचन हें एक उत्तम साधन होतें इतकेंच नव्हे तर ज्यांचा स्वभाव किंवा प्रकृति जन्मतःच अपरिपक्व असेल त्यांस ही सदर प्रकृति परिपक्व दशेस आणण्यास थोर विभूतींच्या चरित्रांचा चांगला उपयोग होत असतो. म्हणून महात्मा गांधी यांचें चरित्र ह्या व्यापक दृष्टीनें सर्वांनींच वाचावें अशी त्यांस आमची शिफारस आहे.

पुणें शहर
१६ मार्च १९१८ } बाळ गंगाधर टिळक










तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

# निःशस्त्रक्रांतिवादी लो. टिळक व सत्याग्रही महात्मा गांधी

लो. टिळकांच्या राजकीय जीवनाचे व विचारांचे राजकीय सुधारणावाद व निःशस्त्रक्रांतिवाद असे दोन कालखंड पडतात. पहिला, वरिष्ठ ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या उदारमतवादी विचारांवरील विश्वासाचा व दुसरा अविश्वासाचा म्हणजे ब्रिटिशसाम्राज्यशाहीच्या दडपशाही व पिळवणुकीच्या धोरणाचा प्रतिकारच केला पाहिजे या निश्चित जाणिवेचा. पहिल्या कालखंडात टिळकांची अशी धारणा होती की वरिष्ठ ब्रिटिश राज्यकर्त्यांना जनतेच्या अडचणींची, दुःखांची व यातनांची जाणीव सतत देत राहिल्याने हळू हळू राज्यकारभार लोकमतानुवर्ती होऊ लागेल. कारण मूळ शासनशक्तीचे अधिष्ठान ब्रिटिशांची संसद आहे व ती संसद उदारमतवादावर आधारलेली आहे. त्यांच्या पहिल्या धारणेतील बदल १९०२ पासून स्पष्ट झाला. त्यांनी साम्राज्यशाहीची मीमांसा (१६–१०–१९०२) तेव्हा मांडली. त्यावरून त्यांचा ब्रिटिश राजनीतीवरचा विश्वास पार उडाला, हे स्पष्ट झाले. स्वगृही उदारमतवाद व उलट साम्राज्यांत दडपशाही व निर्घृण पिळवणूक, हेच ब्रिटिशांचे साम्राज्यशाही राजकारण होय; सर्व साम्राज्यशाह्यांचे हेच राजकारण होय, हे निश्चित झाले. त्यांकरिता काँग्रेसच्या द्वारे राष्ट्रीय ऐक्य निर्माण करणे, जनतेचा निःशस्त्र प्रतिकाराकरिता उठाव करणे, जुलमी कायद्याचा प्रतिकार करणे व स्वराज्याचे देशव्यापी आंदोलन उभारणे याशिवाय अन्य उपाय नाही, अशी त्यांची खात्री झाली. हीच भारतीय स्वातंत्र्याच्या जनताप्रणीत आंदोलनाची नांदी होय. वंगभंगाच्या चळवळीच्या निमित्ताने ह्या आंदोलनास प्रारंभ झाला. ब्रिटिश साम्राज्यशाहीने आपले आसन स्थिर करण्याकरिता व हिंदु-मुसलमानात वैमनस्य निर्माण करण्याकरिता "फोडा व झोडा" हे तत्त्व अमलात आणले व वंगालची फाळणी केली. त्यातून वंगभंगाची चळवळ फोफावली. ती चळवळ दडपण्याकरिता ब्रिटिश राज्यकर्त्यांनी दडपशाहीचे नवे नवे कायदे केले व त्याविरुद्ध असंतोषाची लाट निर्माण करणाऱ्या टिळकांसारख्या नेत्यांवर अधिक बंधने घालण्यात आली. त्यामुळे कायद्याचे अतिक्रमण टाळणे अशक्य होत गेले. राज्यकर्त्यांकडे दाद लागत नाही म्हणून जनजागृतीच्या दबावाने राज्यकर्त्यांना वठणीवर आणण्याचे धोरण हाच एक मार्ग टिळकांसारख्या काही नेत्यांना दिसू लागला.

## सनदशीर व कायदेशीर यांतील भेद

या संदर्भात भारताच्या राजकीय नेत्यांमध्ये एक अत्यंत महत्वाचा वाद उत्पन्न झाला. सनदशीर (Constitutional) उपायांनीच आपण राजकीय सुधारणा घडवून आणू शकू, याशिवाय दुसरा मार्ग उपलब्ध होऊ शकत नाही; कारण ब्रिटिश साम्राज्याची शक्ती अपरंपार आहे, कायद्याच्या बाहेर पाऊल टाकणे अयोग्य आहे, या मताचा पुरस्कार गोखले व त्यांचे नेमस्त अनुयायी करू लागले. टिळकांनी अधिक खोलात जाऊन राज्यशास्त्रदृष्ट्या या मताचे खंडन पद्धतशीर रीतीने केले. त्यांनी पहिला सवाल असा केला की सनदशीर (Constitutional) याचा अर्थ काय ? सनदशीर म्हणजे कायदेशीर, असा गोखले करतात. सनदशीर व कायदेशीर (legal) यांच्यात फार महत्त्वाचा फरक आहे, तो गोखले लक्षात घेत नाहीत. कोणत्याही जनतेच्या मूलभूत हक्कांची सनद अस्तित्वात नसताना राज्यकर्ते आपल्या सोयीप्रमाणे कायदे करतात तेव्हा तेथील कायदा अनियंत्रित राज्यसत्तेचे लक्षण ठरते. त्या कायद्याचा भंग लोकांनी केला तर लोकांचे हे वर्तन









अनुक्रमणिका

असनदशीर म्हणता येणार नाही. कायद्याचे धोरण ठरविण्याकरिता सनद ज्या राज्यपद्धतीत लोकांना मिळालेली असते तेथीलच कायदा हा पालनीय ठरतो. भारतीय जनतेला अशी सनद मिळालेली नाही. सनदशीरपणाचे हे तत्व किंवा हा अर्थ जॉन स्टुअर्ट मिल यांच्या " ऑन् लिबर्टी " या ग्रंथावरून टिळकांनी घेतला. जॉन स्टुअर्ट मिल यांनी सनदशीर याचा अर्थ या पुस्तकाच्या प्रस्तावनेत विशद करून सांगितला आहे. या चर्चेत गोखलेंपेक्षा टिळक हे अधिक सरस व मूलगामी राज्यशास्त्रज्ञ ठरले. या चर्चेच्या संदर्भात " सनदशीर " व " कायदेशीर " (केसरी : ५ मार्च १९०७ ) या लेखात मौलिक रीतीने या मुद्याचे विवेचन करतांना टिळक म्हणतात-- " आजमितीस हिंदुस्थानातील इंग्रजी साम्राज्याची घटना जरी व्यवस्थेशीर असली तरी इतिहासातील रूढ अर्थाप्रमाणे ती " सनदशीर " नाही, असेच म्हटले पाहिजे. गव्हर्नर जनरल यांचे अधिकार पार्लमेंटच्या कायद्यांनी नियमित आहेत पण या बाबतीत प्रजेच्या हातात कोणताही अधिकार नसल्याने " सनदशीर " किंवा "कॉन्स्टिट्यूशनल " हा अर्थ आपल्या राज्यव्यवस्थेला लावता येत नाही. आम्ही जे मांडत आहो किंवा धडपड करीत आहो, ती राज्यकर्त्यांकडून सनदशीर पद्धत प्राप्त करून घेण्याकरिता होय आणि हा हक्क राज्यकर्त्यांकडून मिळवावयाचा आहे. तो मिळविण्यासाठीच हा प्रयत्न आहे. त्याला सनदशीर चळवळ असे नाव देणे चुकीचे होईल. सनदशीर शब्द सोडून दिला तर आमचे प्रयत्न कायदेशीर आहेत की बेकायदेशीर आहेत एवढाच प्रश्न शिल्लक राहतो. हल्लींच्या स्थितीत कायदा करणे आमच्या हातचे नाही. तेव्हा आमचे प्रयत्न इतिहासास, मामुली वहिवाटीस, प्रजेच्या नैसर्गिक हक्कांस धरून नीतिदृष्ट्या जरी योग्य असले तरी ते कायदेशीर किंवा बेकायदेशीर ठरविणे ही केवळ सरकारच्या इच्छेची गोष्ट आहे. आमचे योग्य प्रयत्नही एकवेळ यांच्या कायद्याने बेकायदेशीर होऊ शकतील, अशा वेळी आमचे प्रयत्न बेकायदेशीर आहेत असे म्हणणे भाग पडेल. न्याय, नीति आणि ऐतिहासिक परंपरा किंवा प्रगती यांचा आधार आपणांस आहे की नाही एवढेच नीट पाहिले पाहिजे आणि लोकांचा आम्हास पाठिंबा असला म्हणजे मग आमचे प्रयत्न कायद्याच्या मर्यादेत येतात की बाहेर पडतात याची आम्ही पर्वा करणे उपयोगी नाही, कारण कायदा सरकारच्या हातचा आहे. आता एवढेच खरे की कायदा मोडला गेला तर शिक्षा ही होणार. परंतु कायदा जर जुलमी असेल तर ही शिक्षा सोसूनच त्याचा प्रतिकार केला पाहिजे; एरवी इलाज नाही. नीति आणि कायदा यांची जेव्हा फारकत होते तेव्हा असेच प्रकार घडावयाचे."

अनेक राजकीय विचारवंतांकडून भारताच्या स्वातंत्र्य आंदोलनाची मीमांसा करताना अनेक वेळा असे विधान केले जाते की भारताचा स्वराज्याच्या मागणीचा अर्थ परकीय राज्य नको, परकीय राज्य खराब व जुलमी आहे, ते नष्ट झाले पाहिजे एवढाच नकारात्मक होता. निषेधात्मक भावनेवर आधारलेली स्वराज्याची कल्पना होती. परंतु ही मीमांसा चुकीची आहे. टिळक म्हणतात की, स्वराज्य म्हणजे देशी लोकांचे राज्य एवढाच अर्थ नव्हे. ' स्व ' म्हणजे ' आपला ' हा मोघम अर्थ आहे. " जेव्हा प्रजा आणि राजा दोघेही एकाच धर्मातले, एकाच देशातले, एकाच जातीचे आणि एक प्रकारच्या हिताहितसंबंधाचे असणारे असून राजा प्रजेच्या हिताबद्दल नेहमी तत्पर व दक्ष असतो असे जेव्हा घडते, तेव्हा प्रजेस आपल्यावरील राज्य स्वराज्यच आहे असे वाटणे अगदी स्वाभाविक आहे. "रामराज्य" अशाच प्रकारचे स्वराज्य होते. पण राजे लोक अहंकाराने किंवा अन्य कारणांनी अंध होऊन प्रजेच्या हिताकडे दुर्लक्ष करू लागले किंवा जुलमी झाले म्हणजे ते राज्य लोकांना नकोसे होते, स्वधर्मातील किंवा स्वदेशांतील राजा असताही त्याचे राज्य लोकांस नकोसे होते. पेशवाईच्या अखेरीस शेवटच्या बाजीरावाचे राज्य अव्यवस्थित व दुःखकारक होते. म्हणून खरे स्वराज्य स्वतःच्या राजाचे राज्य नव्हे. तर स्वराज्य म्हणजे प्रजेच्या तंत्राने चाललेले राज्य होय. " अशा अर्थाचे विचार टिळकांनी मांडले. ते वारंवार असे स्पष्ट प्रतिपादन करतात की " ज्या राज्याचा कारभार प्रजेच्या किंवा प्रजापक्षाच्या तंत्राने चालतो तेच खरे स्वराज्य होय... नुसता स्वदेशी राजा असला म्हणजे काही सर्व कार्यभाग होत नाही ... राजा स्वदेशस्थ की परदेशस्थ या प्रश्नापेक्षा प्रजेच्या हातात



अनुक्रमणिका







सत्ता किती हाच प्रश्न महत्त्वाचा होऊन बसला आहे. " ( स्वराज्य आणि सुराज्य ९–४–१९०७ )

" इंग्रजी सरकारची राज्यव्यवस्था केवळ राज्यकर्त्या व थोड्या अधिकारी वर्गाच्या तंत्राने चालत असल्यामुळे आम्हास सुखकर किंवा फायदेशीर होणार नाही आणि स्वावलंबनाची पद्धती कायम रहावी तर तसे होणे अशक्य नाही. राज्यात शिस्त ज्याप्रमाणे अपेक्षित असते ती त्याप्रमाणे इंग्रजी राज्यात नाही व त्यामुळे इंग्रजी राज्याच्या बेशिस्तीने व कायद्याने प्रजा चोहोकडून अडून गेली आहे. राज्यपद्धती नुसती शिस्तवान असल्याने कोणतेही राज्य लोकांना सुखकारक होते, व लोकांच्या तंत्राने चालले म्हणजे ते त्यांना हितकर होते, या दृष्टीने विचार केला म्हणजे प्रजेच्या तंत्राने चालावे असे म्हटले पाहिजे. जेथे सल्लामसलतीने राज्यकारभार चालत असतो तेथे राजा किंवा अधिकारी परदेशस्थ असले तरी, स्वराज्य आणि सुराज्य ह्या दोहोंचे सुख लोकांना प्राप्त होण्यास अडचण पडणार नाही. सर्वांत मुख्य गोष्ट म्हणजे जे आपल्यास हितकारक वाटते त्या दृष्टीने राज्यकारभार चालविण्याकरिता आपणांस सर्वांना अधिकार असावा ही होय आणि खरे स्वराज्य हेच होय' 'स्व' म्हणजे ज्याचा तो, किंवा लोक अथवा एकंदर प्रजा; आणि त्यांचे म्हणजे त्यांच्या सल्ल्याने चालणारे जे राज्य ते स्वराज्य. अशा स्थितीत राजा स्वदेशी असला तर चांगलेच, परदेशस्थ असला तरी फारशी हानी होत नाही. असले राज्य व्यवस्थित व शिस्तवार ... सुराज्यच असावयाचे, सुराज्याने स्वराज्याची वाण भरून येत नाही." परकीय राज्य जुलमी आहे व बेजबाबदार आहे. स्वराज्याशिवाय आधुनिक जगाच्या पार्श्वभूमीवर भारतीय जनता उन्नती करू शकणार नाही; या विचारावर टिळक येऊन ठेपले. हा त्यांचा वैचारिक ध्येयाचा दुसरा टप्पा होय व तोच भारताच्या स्वातंत्र्याच्या आंदोलनाचा प्रथम कालखंड होय.

या कालखंडात प्रवेश केल्यानंतर भारताच्या मानवी जीवनाचा आधुनिक रीतीने सर्वांगीण विकास करावयाचा आहे आणि त्यासाठी पाश्चात्य परचक्राच्या शृंखला तोडल्या पाहिजेत अशा निर्धारावर टिळक येऊन ठेपले. त्यांचे लेखन अधिक धारदार होऊ लागले व लेख तळपू लागले. स्वराज्याचा प्रथमपासून अखेरपर्यन्तचा मार्ग त्यांच्या क्रांतदर्शी दृष्टीच्या समोर होता.

## टिळक गांधीमार्गाचे पहिले उपदेशक

गांधीजी हे स्वतःस गोखल्यांचे शिष्य म्हणत असले, व वैयक्तिक संबंधामुळे हे शिष्यत्वाचे नाते जरी निर्माण झाले असले तरी राष्ट्रीय आंदोलनाच्या संदर्भात असेच म्हणावे लागते की गांधी हे एका अर्थी टिळकांचे अनुयायी होते. कारण गांधी–मार्ग हा टिळकांना दिसला होता. यावर कोणी असे म्हणेल की टिळक हे सशस्त्र क्रांतीच्या पाठीशी उभे होते हे जर सत्य असेल तर गांधी त्यांचे अनुयायी होते असे कसे म्हणता येईल ? सशस्त्र क्रांतीचा मार्ग हा अव्यवहार्य मार्ग आहे असे टिळकांनी वारंवार म्हटले आहे. सशस्त्र क्रांतीचा मार्ग आक्रमणाऱ्या देशभक्तांबद्दल टिळकांना नितांत सहानुभूति वाटत होती हे स्पष्ट असले तरी टिळक हे आपले विचार प्रामाणिकपणे मांडीत होते असे जे मानतात त्यांना टिळक हे सशस्त्र क्रांतीच्या मागे नव्हते याबद्दल संशय बाळगण्यास कारण नाही. टिळक हे एका अर्थी गांधी–मार्गाचे पहिले उपदेशक होते असेही म्हणता येते. टिळकांची सनदशीर व कायदेशीर या संबंधांतील मौलिक मीमांसा लक्षात घेतली असता याबद्दल शंका रहात नाही. १९०७ साली जानेवारी २ या दिवशी कलकत्त्याच्या कॉलेज स्क्वेअरमध्ये टिळकांनी जे व्याख्यान दिले त्यात जहाल व नेमस्त ह्या दोन्ही पक्षांचा निर्देश करून दोन्ही मधला फरक स्पष्ट करून दाखविला. जहाल हे स्वावलंबनपूर्वक स्वराज्यासाठी लढावे असे म्हणतात तर नेमस्त हे ब्रिटिशांच्या भल्यासाठी स्वराज्याची भिक्षा मागणारे आहेत, असा दोन्हीतला फरक त्यांनी स्पष्ट केला. ध्येय एक परंतु कार्यक्रम वा मार्ग मात्र निरनिराळे.

या संदर्भात ते कलकत्त्याच्या भाषणात म्हणतात की, " तुमच्यात सशस्त्र प्रतिकाराची शक्ती नाही. हे जरी खरे असले तरी तुमच्यात बहिष्कार आणि असहकार याची शक्ती खासच आहे. इंग्रजी राज्याच्या विरुद्ध तुम्ही ही शक्ती वापरावयास नको काय ? आपण बहिष्कार घालू शकतो. आपल्या राज्याच्या सरहद्दीबाहेर रक्त आणि पैसा वापरला जाणार नाही अशी तजवीज करू शकतो.







आपले न्यायासन योग्य वेळी निर्माण करू शकतो आणि अखेरीस करबंदीही करू शकतो. स्वदेशी आंदोलनाबरोबर बहिष्कार आणि सविनय कायदेभंगही आचरू शकतो. आपला बहिष्कार हा मात्र परदेशी माल विकणाऱ्या व घेणाऱ्या लोकांवर जबरदस्ती करण्याचा आहे. राजद्रोहाचा कायदा आपण सविनय कायदेभंगाने मोडू शकतो. याचे परिणाम काय होतील याची पर्वा करू नये. तीन-चार हजार लोकांना कारागृहामध्ये राहाण्यास प्रवृत्त करुन नोकरशाहीची स्थिती केविलवाणी करू शकतो. ही क्रांतीची सुवर्णसंधी प्राप्त झाली आहे. ही क्रांती रक्तहीन क्रांती होय. या क्रांतीमध्ये रक्त सांडले जाणार नाही असे नाही. जनतेला यातना होणार नाही असे नाही. यातना सहन करण्याची तयारी करावी. या यातना भयंकर असतील याची खूणगाठ बांधा !! " हे गंभीर विचार त्यांनी मोठ्या हिंमतीने आणि भीष्म प्रतिज्ञेने आमच्या समोर मांडले, असे एका राजकीय विचारवंताने लिहून ठेवले आहे. याशिवाय दुसरे प्रमाण असे की, टिळकांनी गांधी शिष्या सौ. अवंतिकाबाई यांनी लिहिलेल्या गांधी चरित्राच्या प्रस्तावनेत म. गांधींच्या सत्याग्रहाचे तात्विक रहस्य मांडून सत्याग्रह मार्गाचे समर्थन केले आहे.*

टिळकांचे टीकाकार यासंबंधी असा आक्षेप घेतात की त्यावेळी टिळक हे जर अशा निर्वाणीच्या लढ्याचे उद्गाते होते तर मग त्यांनी १९०८ सालच्या राजद्रोहाच्या खटल्यामध्ये मी राजद्रोह केला नाही, तो सिद्ध होऊ शकत नाही, अशा तऱ्हेचा पवित्रा का घेतला ? त्याचप्रमाणे ' मी जे लिहीन ते कायद्याच्या सीमेत राहूनच लिहीन ' असे वारंवार का लिहितात ? टिळक मुत्सद्दी होते. त्यांना जनतेला पाठीशी ओढावयाचे होते. याकरिता त्यांना कायद्याच्या मर्यादेत लेखनस्वातंत्र्याचा उपयोग करावयाचा होता व तो उपयोग उत्तम रीतीने त्यांनी करून घेतला. ह्याचे प्रत्यंतर त्यांच्या दोन्ही कारागृहवासाच्या शिक्षेनंतर मिळाले. टिळक हे त्यावेळच्या कालखंडाच्या महान् जनशक्तीचे प्रतिनिधी होते. त्यांच्या विचाराच्या प्रभावाने लोक कारागृहाच्या दरवाजापर्यंत येऊन ठेपले, परंतु कारागृहाच्या दरवाजाला धक्का मारण्याइतके आत्मबल तोपर्यंत त्यांना प्राप्त झाले नव्हते. टिळकांसारखे फार थोडेच कारागृहाच्या भिंती आड विजनवासी होऊन यातना सहन करीत होते. एका अर्थाने असे म्हणता येईल की आम्ही तुमच्या मागून येण्यास तयार आहो असे आश्वासन जनतेकडून टिळकांना न मिळाल्यामुळे टिळक कायद्याच्या मर्यादेत राहूनच जनजागृतीचे कार्य करीत राहिले. हे आश्वासन गांधीजींना मिळाले म्हणून ते पुढे गेले. तात्पर्य, टिळक युगातूनच गांधी युगाचा प्रारंभ झाला.

---

* या नवभारताच्या अंकात ( पृ. २० ते २४ ) ती प्रस्तावना उद्धृत केली आहे.










श्री. वि. मो. पटवर्धन

# हिंदुधर्मातील काही वादग्रस्त विचार

( १ ) हिंदुधर्मातील काही प्रमुख तत्त्वे विसाव्या शतकातील पुरोगामी विचारप्रवाहांच्या अत्यंत विरुद्ध आहेत. त्यामुळे विचारी हिंदू माणसाच्या स्वतःच्या धर्माबद्दलच्या आदराच्या भावनेस मोठाच धक्का बसतो. उपनिषदे व गीता ह्यामधील उच्च आध्यात्मिक विचार हाच काय तो हिंदुधर्मातील घेण्यालायक भाग आहे व पारंपरिक आचारविचार, समाजव्यवस्था व कुटुंबसंस्था ह्याबाबतचे सनातन हिंदुधर्माचे आदेश त्याज्य आहेत अशी भावना सर्वत्र दिसते. हे मत जरी सध्याच्या विचारप्रवाहास धरून असले तरी हिंदुधर्मातला हा टाकाऊ भाग कोणत्या ऐतिहासिक व भौगोलिक कारणांनी निर्माण झाला व त्यामुळे आपल्या समाजाचे कोणते फायदे तोटे झाले त्याची संपूर्ण छाननी करणे जरूरीचे आहे. अशी छाननी केल्यावरच त्या त्याज्य समजल्या जाणाऱ्या भागातले काय ठेवावे, काय टाकावे व त्यापासून कोणता बोध घ्यावा ह्याचे योग्य मूल्यमापन करता येईल. ह्या दृष्टीनेच खालील लेखात काही विचार मांडले आहेत.

विषयप्रवेश करण्याआधी प्रथम पौराणिक काळातील इतिहासाचा थोडा धावता आढावा घेणे जरूर आहे.

( २ ) इ. स. पू. ६०० पासून म्हणजे महाभारतकालापासून भारताचा इतिहास सुसंगत रीत्या उपलब्ध आहे. इ. स. पू. ३००० ते इ. स. पू. ६०० ह्या काळातील इतिहासाची साधने त्रोटक आहेत. मोहेंजोदारोसारख्या उत्खननातून काही निर्णायक पुरावे मिळू शकतात. आर्य टोळ्या ह्या देशात आल्यापासून, म्हणजे इ. स. पू. २००० अथवा इ. स. पू. १५०० पासूनचा महाभारतापर्यंतचा इतिहास काही प्रमाणात आपल्या पुराणात उपलब्ध आहे. परंतु पुराणात ऐतिहासिक घटना व मनोरंजक कल्पना ह्यांची फार सरमिसळ झाली असल्याने त्या आधारे ऐतिहासिक सुसंगती लावणे जरा कठीणच काम आहे. ही मर्यादा लक्षात घेऊन, उपलब्ध निर्णायक ऐतिहासिक पुराव्याच्या अनुषंगाने व पुराणातील कथांच्या आधारे इ. स. पू. ३००० ते इ. स. पू. ६०० पर्यंतचा इतिहास खालीलप्रमाणे मांडता येईल.

हिंदुधर्माच्या इतिहासाच्या दृष्टीने सर्वात महत्त्वाची घटना म्हणजे इ. स. पू. १५०० च्या सुमारास संस्कृत भाषा बोलणाऱ्या व स्वतःस आर्य म्हणविणाऱ्या एका टोळीचे ह्या देशात झालेले आगमन ही होय. ह्या कालापूर्वीही हिंदुस्थानात निग्रॉइड, ऑस्ट्रेलॉइड, मंगोलियन, कॉकेशियन अशा अनेक वंशाचे लोक निरनिराळ्या वेळी येऊन वस्ती करून राहिले होते. कोलारियन, मोन ख्मेर व द्रविडियन ह्या येथे आलेल्या निरनिराळ्या टोळयांच्या प्रमुख भाषा होत्या. ह्यापैकी द्रविड भाषा बोलणाऱ्यांची संस्कृती उच्च दर्जाची होती असे मोहेंजोदारोच्या उत्खननात आढळून आले आहे. ह्या लोकांचा मेसापोटेमिया व क्रीट ह्या संस्कृतींशी जवळचा संबंध होता. तटबंदी बांधलेल्या खेड्यात व शहरात ते रहात असत. ह्या लोकांचे कारागिरीतील कौशल्य बऱ्याच दर्जाचे होते. त्यांस ज्योतिषशास्त्र व गणित ह्यांची चांगली माहिती होती; त्यांच्या धर्मकल्पनेत शंकर, काली, चंद्र, सूर्य, गाय, बैल व सर्प ह्यास महत्त्वाचे स्थान होते.

ह्याशिवाय कमी अधिक प्रमाणात सुधारलेल्या अथवा मागासलेल्या अनेक टोळ्या हिंदुस्थानात होत्या. ह्या द्रविड लोकांशी त्यांचा संबंध येणे अपरिहार्य होते. त्यापैकी काही टोळ्या द्रविडांशी देवघेवीचा व्यापार करीत असाव्यात, काही हल्लेखोर असाव्यात व काहींना गुलामही करून घेण्यात आले असावे. निरनिराळ्या रानटी अथवा अर्धप्रगत टोळयांच्या धर्मकल्पनेत जादूटोणा, आत्मा व पुनर्जन्म त्या संबंधीच्या काही अपक्व कल्पना, पितृपूजा, मूर्तिपूजा, नरबळी देण्याची व नरमांस भक्षण करण्याची चाल, लिंगपूजा अशा प्रकारांचा अंतर्भाव असावा.










भारताच्या विशिष्ट भौगोलिक रचनेमुळे अनेक टोळ्या बाहेरून, विशेषतः पश्चिमेकडून येथे येत व एकदा आल्यावर इथेच वस्ती करून रहात. ह्या कारणाने अनेक नद्या नाले सतत येऊन मिळणाऱ्या एखाद्या प्रचंड सरोवरासारखी भारतीय समाजाची प्रथमपासून परिस्थिती आहे. अशा प्रकारच्या समाजांस बहुरंगी समाज ( Plural Society ) असे म्हणतात. आधुनिक काळात देखील, अमेरिकेतील संयुक्त संस्थाने, कॅनडा, सयाम, दक्षिण आफ्रिका, मलाया वगैरे अनेक ठिकाणी असे बहुरंगी समाज आहेत. ह्या समाजातील निरनिराळे गट आर्थिक व्यवहारापुरताच परस्पर संबंध ठेवतात. त्यांचे सामाजिक जीवन व शरीरसंबंध प्रायतः स्वतःच्या गटापुरतेच मर्यादित असतात. हिंदूमधे अनेक जाती निर्माण होण्यास बहुरंगी समाज हे प्रमुख ऐतिहासिक कारण आहे व त्याचे विवेचन पुढे केलेले आहेच.

इ. स. पू. १५०० च्या सुमारास आर्य लोकांची संस्कृत भाषा बोलणारी एक प्रमुख टोळी भारतात आली. पशुपालन, किरकोळ शेती ( Shifting agriculture ) व थोडासा व्यापार करणारी ही एक लढाऊ जमात होती. काव्यमय प्रार्थनांनी व यज्ञ करून देवतास प्रसन्न करून घेणे हा आर्यांच्या धर्मकल्पनेचा विशेष होता. ह्या कारणाने भाषेवर प्रभुत्व असलेले लोकच त्यांमधे पुरोहित होत व त्यांची संस्कृत भाषाही त्या काळी प्रचलित असणाऱ्या इतर भाषांपेक्षा पुढारलेली होती. सांस्कृतिक प्रगतीच्या एका विशिष्ट टप्प्यात ह्या टोळीमधे श्रमविभागाप्रमाणे पुरोहित, योद्धे आणि पशुपालन, शेती व व्यापार करणारे इतर लोक असे वर्ग पडले. ह्याशिवाय लढाईत पकडून आणलेले गुलाम व स्त्रिया ह्यांचीही थोडीफार संख्या असावी. हिंदुस्थानात आलेले आर्य आणि इराण, ग्रीक व रोम येथे गेलेल्या टोळ्या एकाच ठिकाणापासून विखुरल्या असा समज आहे. पुराणकालीन ग्रीक व इराणी समाजातही अशी चार वर्गांची कल्पना आहे[1]. या कारणास्तव चातुर्वर्ण्याची मूळ कल्पना हिंदुस्थानात येण्यापूर्वीपासून आर्यांत होती असे मानण्यास आधार आहे.

आर्यलोक हिंदुस्थानात आल्यावर त्यांचे इतर भारतीय टोळ्यांशी धार्मिक व राजकीय असे दोन्ही प्रकारचे संघर्ष जोरात सुरू झाले. त्यामुळे आर्यांच्या टोळीतील पुरोहित व योद्धे यास जास्ती महत्व आले. हे पुरातन संघर्ष पुराणामधून देव, दानव, यक्ष, असुर सर्प व मानव ह्यामधील कलहांच्या अनेक मनोरंजक कथांच्या द्वारे सांगितले आहेत.

अशा प्रकारच्या अर्ध्याएक शतकांच्या संघर्षानंतर, सरस्वती व दृषद्वती ह्या दोन नद्यामधील ब्रह्मावर्त देशात आर्यांनी व आपली पहिली वसाहत केली. ह्या आर्यांच्या टोळीचा मनू नावाचा एक नायक (Patriarch) होता. त्याने मरीचि, अत्रि आदि पुरोहितांच्या साहाय्याने भारतीयांच्या विविध धर्मकल्पनांच्या समन्वयातून तयार झालेला धर्म व त्यावेळच्या रूढीस अनुरूप अशा मिश्र चालीरीती ब्रह्मावर्तात प्रथम रूढ केल्या. तेच आजच्या हिंदुधर्माचे ' सनातन ' स्वरूप होय. ह्या पहिल्या मनूस स्वायंभुव मनू म्हणतात व त्याचे स्थान एखाद्या धर्मपीठाच्या मुख्याधिकाऱ्यासारखे व लोकमताचा कौल घेऊन प्राप्त होणारे असावे. पुढील सात मनूंपैकी उत्तम तामस, रैवत व चाक्षुष हे स्वायंभुव मनूचे वंशज आहेत. पण दुसरा स्वारोचिष व सातवा वैवस्वत हे त्याचे वंशज दिसत नाहीत. स्वायंभुव मनूच्या वंशात इतर बरेच राजे झाले व त्यांनी मनूच्या धर्मपीठाचा अधिकार मानून, भारतात निरनिराळ्या ठिकाणी लहानलहान राज्ये स्थापली ह्या वंशजामधे वेन, पृथु व दक्ष हे महत्वाचे आहेत. भागवत व हरिवंशातील कथांप्रमाणे वेन राजाच्या कारकीर्दीत मोठा धार्मिक संघर्ष झालेला दिसतो व ' वर्णसंकराविरुद्ध ' लोकमत तयार झाल्याचे दिसते. पृथुच्या कारकीर्दीमधे शेती करण्याच्या रूढ पद्धतीत क्रांतिकारक बदल झाला असावा. पृथुने सूत व मागध ह्या संकीर्ण जाती उत्पन्न केल्या असाही उल्लेख आहे. कदाचित ह्याच्या कारकीर्दीत चातुर्वर्ण्याच्या पारंपरिक कल्पनेबाहेरील काही संकीर्ण व्यवसायांचाही उगम झाला असावा. दक्ष हा प्रजापती गणला जातो कारण त्याने आपल्या मुली, सोम, धर्म कश्यप वगैरेस दिल्या व त्यापासून वैवस्वत मन्वंतरातील प्रजा उत्पन्न झाली अशी कथा आहे.

---

१. वर्ण व जाती : पाने ९३ ते ९४








# हिंदुधर्मातील काही वादग्रस्त विचार

स्वायंभुव मनूपासून सहाव्या चाक्षुष मनूपर्यंत सात पिढ्यांचा म्हणजे दोनशे ते अडीचशे वर्षांचा अवधी लोटल्यावर ब्रह्मावर्तात एक मोठा पूर आला व आर्य-लोकास गंगायमुनांच्या काठी स्थलांतर करावे लागले असे दिसते. ह्या स्थलांतरानंतर भागवत पुराणाप्रमाणे सूर्यपूजा करणारा कोणी सत्यव्रत नावाचा राजा सातवा वैवस्वत मनू झाला. त्याने लोकांचे मात्स्यन्याया-पासून संरक्षण करण्याकरता नियम घालून दिले असा कौटिलीय अर्थशास्त्रात उल्लेख आहे.[१] कदाचित वेन व पृथूच्या काळातील वर्णसंकराचे बंड लक्षात घेऊन रूढ असलेली चातुर्वर्ण्याची पद्धत त्याने जास्ती कठोर केली असावी असे दिसते. वैवस्वत मनूचा भाऊ वैवस्वत यम हा पितृलोकाचा राजा झाला अशी पुराणात कथा आहे. पारशांच्या धर्मग्रंथातही यमाचा उल्लेख आहे. फिरदोशी ह्या मध्ययुगीन पारशी ग्रंथ-काराने कामधंद्यावरून समाजाचे चार भाग यमाने प्रथम पाडले असा उल्लेख केला आहे.[२] पण वरील चार भाग झरतुष्ट्राने निर्माण केले हा अवेस्तातला उल्लेख जमेस धरता यमानेही आपल्या भावाप्रमाणेच लोकात रूढ असलेल्या चालीस दृढ करण्याकरता 'पितृ लोकात' नियम केले असे अनुमान काढावे लागते.

वैवस्वत मनूच्या मृत्यूनंतर मनूचे धर्मपीठ लुप्त झालेले दिसते. त्याने सूर्यवंश व चंद्रवंशाचे राजे उत्पन्न केले. त्यापैकी श्रीरामाच्या काळात दक्षिण भारतात हिंदु-धर्माचा मोठ्या प्रमाणावर प्रसार झाला असावा. त्यानंतर महाभारत कालात महर्षी व्यासानी वेदाचे चार भाग पाडून ते लिहून काढले व त्यांच्या शिष्यांनी स्मृती, पुराणे व इतर शास्त्रे ह्यांचे लिखित वाङ्मय निर्माण केले. महाभारत कालानंतरचा इतिहास सुसंगत रीत्या उपलब्ध आहे पण महाभारतानंतर हिंदूधर्मात कोणतेही मूलभूत बदल घडून आलेले दिसत नाहीत.

( ३ ) आर्य, द्रविड व इतर काही रानटी टोळ्या ह्यांच्या तिघांच्या धर्मकल्पनांचा समन्वय झालेल्या ह्या हिंदुधर्मातील समाजव्यवस्था व चालीरीती घडविण्यास खालील तीन मूलभूत ऐतिहासिक कारणे आहेत असे प्रस्तुत लेखकाचे मत आहे.

अ ) बहुरंगी समाज

आ ) पितृप्रधान कुटुंबपद्धती

इ ) समाजातील वर्गांची चातुर्वर्ण्याप्रमाणे श्रेणी ठरविण्याची कल्पना हिंदुधर्माची ज्या काळात घडण झाली तो काळ सरंजामशाही अर्थव्यवस्थेचा होता. तेव्हा सरंजामशाहीच्या पार्श्वभूमीवर ह्या मूलभूत कारणांचा एकत्र परिणाम होऊन विविध जातींचा आपला समाज कसा निर्माण झाला ते आता पाहू.

अ ) बहुरंगी समाज : मागे सांगितल्याप्रमाणे बहुरंगी समाज ( plural society ) हें भारताचे प्रमुख ऐतिहासिक व भौगोलिक वैशिष्ट्य आहे. आधुनिक काळातील निरनिराळ्या बहुरंगी समाजांच्या निरीक्षणावरून असे दिसते की ह्या बहुरंगी समाजात वांशिक, धार्मिक, सांस्कृतिक अथवा भाषिक भेद असलेले गट असतात. हे गट एकाच समाजाचे भाग असल्याने त्यामधे परस्पर आर्थिक व्यवहार होत असतात. सर्वसाधारणपणे प्रत्येक गटाच्या सांस्कृतिक, राजकीय व आर्थिक दर्जानुसार विशिष्ट प्रकारच्या व्यवसायांची मक्तेदारी विशिष्ट गटांकडे येते असे दिसून येते. येते. सांस्कृतिक दर्जा कमी असलेले लोक कमी प्रतीचा व्यवसाय करतात. उदाहरणार्थ अमेरिकेतील व दक्षिण आफ्रिकेतले निग्रो लोक चाकरी अथवा हलक्या प्रकारची कामगारी करतात. सयाम देशातील सयामी, चिनी, व युरोपियन लोक हे आपापल्या दर्जाप्रमाणे विशिष्ट सामाजिक व्यवसाय करतात, व शहराच्या निरनिराळ्या भागात आपले जीवन स्वतंत्रपणे व्यतीत करतात. अमेरिकेतील संयुक्त संस्थानात, निग्रो वगळता इतर गोऱ्या लोकातही, इंग्लिश, आयरिश, इटालियन, जर्मन, कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट, ज्यू असे अनेक भेद आहेत. औद्योगीकरण व दळणवळण ह्यामुळे हे भेद ठळकरीत्या दिसत नसले तरी प्रत्येक गट स्वतःच्या चालीरीती व वेगळेपणा जतन करण्याची धडपड करीत असतो व हे वेगळेपण मुख्यतः लग्नसंबंध स्वतःच्या गटापुरतेच मर्यादित ठेवून राखले जाते

विसाव्या शतकातील ही परिस्थिती लक्षात ठेवून दोन ते तीन हजार वर्षापूर्वी भारतातील शहरात व खेड्यात राहणाऱ्या समाजाची कल्पना करता येईल.

---

१. वर्ण व जाती. पान १४१

२. वर्ण व जाती. पान ९३-९४











धार्मिक, सांस्कृतिक, वांशिक व भाषिक भेदाची प्रखरता त्यावेळी आजच्यापेक्षा कितीतरी जास्ती प्रमाणात होती. असे भेद असलेल्या निरनिराळ्या टोळयातील देवघेव व संघर्ष वाढून जेव्हा खेडी व नगरे स्थापन होऊ लागली तेव्हा प्रत्येक टोळी आपल्या मूळच्या भौगोलिक विभागातील अनेक खेड्यात विखुरली गेली व स्वतःच्या मगदुराप्रमाणे कोणतातरी व्यवसाय करू लागली. त्यात परत टोळयाटोळयात शरीरसंबंध होऊन मिश्र वंशाचे व चालीरीतींचे गटही निर्माण झाले. जे गट राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक दृष्ट्या आघाडीवर होते त्यामधे . मागासलेल्या गटांबद्दल तुच्छता, तिरस्कार, अनुकंपा, परोपकारवृत्ती वगैरे भावना निर्माण झाल्या. ह्या उलट मागासलेल्या गटांमधे पुढारलेल्या गटांबद्दल आदर, भीती, हेवा व द्वेष ह्या भावना निर्माण झाल्या हा समाज बहुरंगी असल्यामुळे प्रत्येक गटास चालीरीती व आचारविचार ह्या बाबतीत आपले वेगळेपण टिकवायची सवलत होती अशा प्रकारे जुन्या सरंजामशाहीच्या काळात विविध जातीजमाती निर्माण होण्याची पार्श्वभूमी बहुरंगी समाजामुळे भारतात तयार झाली.

आ ) **पितृप्रधान कुटुंबपद्धती** : सर्व मानवी समाजांच्या इतिहासावरून असे दिसते की समाजाच्या सांस्कृतिक प्रगतीबरोबरच मातृप्रधान कुटुंबपद्धतीचे हळूहळू पितृप्रधान कुटुंबपद्धतीत रुपांतर होते. संक्रमणाच्या काळात पितृप्रधान कुटुंबपद्धतीस अनुकूल असणाऱ्या विचारांबद्दल आग्रहीवृत्ती असणे स्वाभाविक आहे. हिंदुधर्मावर सर्वात मोठा प्रभाव पाडणारी आर्यांची टोळी पितृप्रधान कुटुंबपद्धतीची अभिमानी होती हे सूचित करणारे अनेक श्लोक मनुस्मृतीत आढळतात; किंबहुना स्त्रियांबद्दल अनुदारवृत्ती दर्शविणारे मनुस्मृतीतील श्लोक[1] अशा प्रकारच्या आग्रहीवृत्तीचेच द्योतक आहेत असे म्हणता येईल. पितृप्रधान कुटुंबपद्धतीतील खालील विशेषांनी आपल्या समाजाच्या घडणीवर खोल परिणाम केला आहे.

१ ) स्त्रियांचे लैंगिक स्वातंत्र्य पुरुषांपेक्षा जास्ती मर्यादित झाले. स्त्रीच्या ' पातिव्रत्याचा ' व 'शीलाचा' सर्व समाजाने आदर केला पाहिजे हा विचार प्रसृत झाला.

२) पुरुष हा कुटुंबप्रमुख होऊन स्त्रीवर त्याची मालकी निर्माण झाली. शिशुसंगोपन व अन्नाराधन हे मूळचे सामाजिक व्यवसाय कुटुंबाच्या खाजगी क्षेत्रात गेले. त्यामुळे स्त्रीचे सामाजिक व्यवहारातील स्थान नष्ट होऊन तिची नैसर्गिक दुर्बलता जास्ती तीव्र झाली.

३ ) स्त्री ही एक अतिशय मूल्यवान संपत्ती आहे असा विचार निर्माण झाला. त्यामुळे पित्याहून खालचा दर्जा असलेल्या पुरुषाबरोबर तिचे लग्न होणे निंद्य समजले गेले. उलट खालच्या दर्जाच्या स्त्रीचे उच्च दर्जाच्या पुरुषाशी लग्न होणे तितके निंद्य नव्हे अशीही कल्पना आली.

४) व्यभिचार हा भयंकर गुन्हा समजला गेला. त्यातही खालच्या दर्जाच्या पुरुषाने वरच्या दर्जाच्या स्त्रीबरोबर केलेला व्यभिचार जास्ती भयंकर समजला जाऊ लागला.

५) पित्याच्या संपत्तीचा वारसा मुलाकडे येऊ लागला व पित्याचा परंपरागत धंदा मुलाने चालवावा अशी अपेक्षा निर्माण झाली.

पितृप्रधान कुटुंबपद्धती असलेल्या सर्वच समाजात हे विशेष आढळत असले तरी मध्ययुगीन समाजात त्यांची धार जास्ती तीव्र होती.

इ ) **समाजातील वर्गांची चातुर्वर्ण्याप्रमाणे श्रेणी ठरविण्याची कल्पना** : वर्ण ह्या शब्दाचा चातुर्वर्ण्याच्या संदर्भातला अर्थ वर्ग असा आहे असे काही विद्वानांचे मत आहे.[2] ह्या चार वर्गांचा उगम आर्यांच्या भटक्या टोळीत प्रथम निर्माण झालेल्या श्रमविभागात आहे. महाभारतातील शांतिपर्वात ' प्रथम एकच वर्ण होता व नंतर त्याचे हळूहळू चार वर्ण झाले ' असा उल्लेख आहे. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्यांची धर्मशास्त्रातील कर्मे, पशुपालन, किरकोळ शेती व व्यापार

---

१. मनुस्मृती अध्याय नववा, श्लोक, २, ३ १३, १४, १५, १६, १७, वगैरे

२. वर्ण व जाती पाने ६७ ते ९६.

Hindu Society– An Interpretation : Pages 50,51



अनुक्रमणिका







करणाऱ्या लढाऊ जमातीस अनुरूप आहेत. शूद्रवर्णाचे मूळ गुलामगिरीत आहे असे दिसते. मनुस्मृतीमधे, लढाईत पकडून आणलेला, पोटाकरता सेवा करणारा, दासीपुत्र, विकत घेतलेला, नजर केलेला व वडिलांचे वेळेपासून सेवा करणारा असे दासांचे सात प्रकार सांगितले आहेत.[१] तसेच शूद्रांचे पितर सुकालिन हे वसिष्ठाने निर्माण केले असे म्हटले असून वसिष्ठाचे अक्षमाला नावाच्या नीच जातीच्या स्त्रीशी लग्न झाले होते असाही उल्लेख आहे.[२] पण हिंदुसमाजातील शूद्र हा गुलाम ( Slave ) नसून सरंजामशाहीतला दास ( Serf ) आहे; एवढेच नव्हे तर तो उच्च वर्णाची सेवा करण्यापेक्षा कारागिरीचे धंदेच जास्ती प्रमाणात करताना आढळतो ह्यावरून शूद्र हे काही अप्रगत पण आर्यांसारख्या पुढारलेल्या समाजाचे वर्चस्व मान्य करणाऱ्या टोळ्यांपासून व आर्यांपासून त्यातील स्त्रियांस झालेल्या मिश्र प्रजेपासून निर्माण झाले असावेत असे दिसते. प्रथम प्रथम ते उच्च वर्णांची हलकी कामे करीत असावेत पण नंतर काही काळाने त्यांनी स्वतंत्र कारागिरीचे धंदे सुरू केले असावेत.

मध्ययुगीन समाजाचा एक विशेष म्हणजे लोकांचा धर्मावर असलेला गाढ विश्वास. पुरोहिताना व धर्मगुरूना अशा समाजात महत्वाचे स्थान असे. राजे व सरदार त्यानाही पुरोहितांच्या जवळजवळ बरोबरीचेच स्थान असे. ह्या दोन वर्गात त्या काळी सामाजिक वर्चस्वासाठी स्पर्धा चाललेल्या आढळून येतात. त्याचबरोबर दासांना ( Serfs ) तुच्छतेने व हीनतेने वागविण्यात येत असे. अशा प्रकारच्या मध्ययुगीन प्रवृत्तीनुसारच आपल्याकडे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशी श्रेणी ठरून गेली.

भारताप्रमाणे पुराणकालीन इराणी धर्मात, ग्रीस व रोममधे, तसेच जपानमधेही चातुर्वर्ण्यासारख्या वर्गकल्पना होत्या असे दिसते.[३] वर्ण ह्याचा अर्थ वर्ग मानला तर असे वर्ग सगळ्याच समाजात दिसतात पण हिंदुसमाजासारखी वर्णव्यवस्था मात्र इतरत्र कोठे दिसत नाही. ह्याचे कारण हे की भारतीय समाज प्रथमपासून बहुरंगी आहे व वर उल्लेखिलेले इतर समाज एकसंध होते. चार वर्गांचे जन्मावरून स्थायी विभाग करणे एकसंध समाजात तितकेसे शक्य होत नाही. कारण वर्गावर्गातील शरीरसंबंध अशा समाजात जास्ती प्रमाणात होत असतात व अशा शरीरसंबंधाने उत्पन्न झालेल्या प्रजेला मिश्र प्रजा म्हणून वेगळे करणे अवघड असते. भारतातील बहुरंगी समाजात मात्र व्यक्तीऐवजी गटांची अथवा समूहांचीच वर्णव्यवस्थेत विभागणी करण्यात आली. ह्या गटांचा स्वाभाविक कल आपले वेगळेपण व चालीरीती जतन करण्याचा असल्यामुळे, गटामधेच लग्नसंबंध जोडण्याची व जन्मलेल्या अपत्यास त्या गटाचे सदस्य समजण्याची रूढीच पडून गेली होती व वर्ण हे अशा जातींची विभागणी करण्याकरता वापरले गेल्याने, मूलतः वर्गकल्पनेवर आधारलेले वर्णही त्या बहुरंगी समाजात जन्मानुसार ठरू लागले. तसेच व्यवसायांच्या उच्च नीचतेवर वर्णकल्पना बसविली असल्यामुळे मुळातच कमी प्रमाणात असलेल्या व्यवसाय बदलण्याच्या प्रेरणेमध्ये आणखीनच कमकुवतपणा निर्माण झाला.

वर्णात विभागलेल्या ह्या जातींच्या एकमेकातील शरीरसंबंधास संपूर्ण पायबंद घालणे अशक्यप्राय होते. व ह्या शरीरसंबंधामुळे संकीर्ण प्रजा निर्माण झाली. ह्या संकीर्ण जातींची पितृप्रधान कुटुंबपद्धतीवर आधारलेल्या श्रेष्ठ-कनिष्ठतेच्या कल्पनेप्रमाणे परत अनुलोम व प्रतिलोम अशी वर्गवारी करण्यात आली व चातुर्वर्ण्याच्या परंपरागत चौकटीत न बसणारे काही संकीर्ण धंदे ह्या संकीर्ण जातीस देण्यात आले. संकीर्णातील चण्डाल, पुक्कस अशा काही जातीच अस्पृश्य झाल्या. सूत, मागध वगैरे जातीना मानाचे स्थान होते.

वरील विश्लेषणानुसार, बहुरंगी समाज, पितृप्रधान कुटुंबपद्धती व मध्ययुगीन सरंजामशाही समाजास अनुरूप असणारी वर्णाच्या श्रेष्ठ-कनिष्ठत्वाची कल्पना ह्यांच्या संकलित परिणामामुळे हिंदुसमाज कसा निर्माण झाला ते कळून येईल. पितृप्रधान कुटुंबपद्धती व

---

१. मनुस्मृति : अध्याय ८ श्लोक ४१५.

२. मनुस्मृति अध्याय ३ श्लोक १९७. अध्याय ९ श्लोक २३.

३. वर्ण व जाती : पाने ६७ ते ९६, पान १३७








सरंजामशाही समाज इतरत्रही होते पण बहुरंगी समाज हे भारताचेच वैशिष्ट्य असून त्या कारणाने भारतातील जातिव्यवस्थेचे बहुरंगी समाज हेच प्रधान कारण ठरते. त्याचप्रमाणे आर्य, द्रविड व इतर रानटी टोळ्या ह्यांच्या धर्मकल्पनांचा समन्वय होण्याचे कारणही भौगोलिक परिस्थितीने निर्माण केलेले बहुरंगी समाजाचे बंधन हेच होय.

(४) मनूच्या धर्माधिकाराखाली भारतामधील शहरांची व खेड्यांची जी रचना होऊ लागली त्यामध्ये वर्णव्यवस्थेच्या पारंपरिक चौकटीत न बसणारे इतर अनेक व्यवसाय निर्माण होऊ लागले. त्यापैकी काही व्यवसाय संकीर्ण म्हणून मिश्र जातींकडे देण्याचा स्मृतिकारांनी प्रयत्न केला. पण संकीर्ण लोकांचा सामाजिक दर्जा कमी प्रतीचा असल्याने व नवीन निर्माण होणारे सगळेच व्यवसाय हलके नसल्यामुळे हा प्रयत्न यशस्वी झाला नाही. सर्वच वर्णांच्या मूळ सांगितलेल्या व्यवसायात नवी भर पडली. मध्ययुगीन समाजातील व्यवसाय निरनिराळ्या वर्गात खालीलप्रमाणे विभागले गेले होते असे दिसते. खाली केलेली प्रतवारी व्यवसायांच्या सामाजिक महत्त्वानुसार केली असून त्यातील जवळ जवळ प्रत्येक व्यवसायानुसार समाजात निरनिराळ्या जाती झाल्या आहेत.

(अ) ब्राह्मण :

(१) महंत, राजगुरु, मठाधिपती

(२) राजपुरोहित, राजसचिव, न्यायाधीश, राजवैद्य, राजाचे विद्वान आश्रित.

(३) जमीनदार, सावकार, वरच्या वर्गातील मान्यवर लोकांचे पुरोहित.

(४) भिक्षुक, पुजारी, शिक्षक, ज्योतिषी, कुलकर्णीसारखे सामान्य अधिकारी.

(५) नट व गवई

(६) आचारी, वाढपी, पाणके.

(७) प्रेतसंस्कार करणारे महाब्राह्मण, पतित व संस्कारहीन ब्राह्मण.

( ह्यापैकी सातव्या वर्गातले ब्राह्मण अस्पृश्यासमान गणले जात असत. वैद्यव्यवसायाची मनुस्मृतीत निंदा केली असली तरी समाजात त्यास मानाचे स्थान होते असे दिसते. )

(आ) क्षत्रिय :

(१) राजा व राजाचे जवळचे नातेवाईक.

(२) सरदार, सेनापति, अमात्य, राजकुलातले इतर नातेवाईक

(३) ग्रामाधिपती, नगराधिपती, वतनदार, सैन्यातील लहानसहान अधिकारी

(४) दूत व हेर

(५) सैनिक व शेतकरी

(६) कर्जामुळे अथवा युद्धात शरण आल्यामुळे दास झालेले क्षत्रिय व वनवासात दिवस काढणारे राज्यभ्रष्ट राजे.

(इ) वैश्य :

(१) सधन व्यापारी, जमीनदार व सावकार.

(२) सामान्य व्यापारी.

(३) व्यापारात बुडालेला व कर्जामुळे दास अथवा कारागीर झालेला वैश्य ( पशुपालन व शेती हे मूळचे वैश्यांचे व्यवसाय कालांतराने शूद्रांकडे गेले असे दिसते. )

(ई) शूद्र :

(१) राजाचे सचिव व अमात्य[१]

(२) राजाच्या पदरी असणारे निष्णात कारागीर ( शिल्पी ), सारथी, हेर, कलावंत, राजे व इतर सधन लोकास लागणाऱ्या उंची वस्तू बनविणारे सोनारांसारखे कारागीर.

(३) सैनिक, शिपाई, भालदार, चोपदार, कोष्टी, हलवाई, गवळी.

(४) घरगडी, न्हावी, सुतार, गवंडी, माळी.

(५) गुराखी, हमाल, धनगर, नावाडी, बुरुड.

(६) धोबी, लोहार, तांबट

(७) महार, चांभार, कुंभार, खाटिक, फासेपारधी

(८) भंगी, डोम

( ह्यातील काही व्यवसाय स्मृतिकारांनी संकीर्ण लोकास दिले आहेत. ६, ७ व ८ ह्या वर्गातले लोक अस्पृश्य समजले जातात )

(उ) संकीर्ण लोकांचे व्यवसाय वरील शूद्र लोकांच्या बाहेरील आलेच आहेत. निरनिराळ्या संकीर्ण लोकांचा सामाजिक दर्जा खालीलप्रमाणे ठरलेला दिसतो.

१. पहा : महाभारत शांतिपर्व—अध्याय ८५








(१) जेते म्लेच्छ किंवा यवन राजे.

(२) जित यवन पण सुसंस्कृत मांडलिक राजे, उच्चवर्गीय म्लेच्छ, संस्कारहीन ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य.

(३) सूत (सारथी, अमात्य[१]), मागध (व्यापारी, भाट).

(४) वैदेहक (राजस्त्रियांची सेवा), आयोगव (सुतारकाम), दस्यु × आयोगवकन्या (राजस्त्रियांची सेवा व शिकार), वैदेहक × आयोगवकन्या, वेण (राजाची स्तुती करणारे वादक).

(५) धिग्वण, निषाद, वगैरे.

(६) चण्डाल, श्वपच, सोपाक, कक्कुटक व अन्त्यावसायी (ह्यातील ५ व ६ ह्या वर्गातले लोकच अस्पृश्य गणले जातात).

वरील यादीवरून सामाजिक मान व धार्मिक दर्जा नेहमीच एकत्र होते असे आढळत नाही. ब्राह्मणातील आचारी वगैरेपेक्षा राजदरबारातल्या निष्णात शूद्र कारागिरास बराच जास्त मान असे. त्याचप्रमाणे यवन राजे व उच्च वर्णीय यवन लोक हे धार्मिक दृष्ट्या जरी संकीर्ण समजले गेले तरी त्यांचा सामाजिक दर्जा उच्चवर्णीय हिंदूएवढाच किंवा त्याहूनही वरचा असे.

शूद्र म्हणून गणल्या गेलेल्या लोकात दास (Serfs) कमी प्रमाणात असून स्वतंत्र धंदे करणारे कारागीर जास्ती प्रमाणात दिसतात. संकीर्ण लोकांमधेही शुद्धा-शुद्धतेच्या मध्ययुगीन कल्पनांमुळे नीच ठरलेले व्यवसाय करणाऱ्या जातीसच अस्पृश्य केले गेले व त्याशिवाय इतर जातीस त्यांच्या ठरविलेल्या व्यवसायाच्या उच्च-नीचतेप्रमाणे कमी अधिक मान्यता मिळाली.

वर्णव्यवस्थेत असा विस्तार झाला असला तरी तिचे सूत्र मात्र मूळचेच आहे. ज्या व्यवसायास धर्मशास्त्र व इतर शास्त्रांचे अध्ययन करावे लागे ते व्यवसाय ब्राह्मणाकडे आले. वैद्य, नट व गवई ह्यास अनुक्रमे वैद्यक, संस्कृत भाषा व गायन ह्यांचे अध्ययन करण्याची जरुरी असे. राजकीय सत्तेची पण लिहिण्या-वाचण्याची जरुरी नसलेली सर्व कामे क्षत्रियांकडे होती. ज्या व्यवसायात धनसंचय होत असे पण राजकीय सत्ता नसे ते वैश्यव्यवसाय ठरविले गेले. कारागिरीची व इतर हलकी कामे शूद्रांकडे दिलेली दिसतात.

प्रत्येक जातीचे परंपरागत व्यवसाय ठरले असले तरी जातीतील लोक इतरही काही व्यवसाय करीत. परंपरागत व्यवसायापेक्षा नीच व्यवसाय करणे निंद्य समजले जाई व त्यापेक्षा उच्च व्यवसाय काही बंधने मान्य करून करणे शक्य असे. अशा प्रकारचे उच्चनीच व्यवसाय सुरू केल्यास जातींची उच्चनीचताही कमीअधिक होत असे. ह्यास बरीच उदाहरणे आहेत.[२] कायस्थ हे पूर्वी शूद्र समजले जात पण हल्ली क्षत्रिय समजले जातात. दक्षिण हिंदुस्थानातील सोनार वगैरे व्यवसाय करणारी पांचाल जात स्वतःस ब्राह्मण समजते. ह्याउलट आचारी, नट, गवई वगैरे व्यवसाय करणारे ब्राह्मण नीच समजले जातात. जमीनदारी व सावकारी ब्राह्मणास वर्ज्य नसल्यामुळे असे व्यवसाय करणारे ब्राह्मण मात्र नीच समजले जात नाहीत.

(५) जातिसंस्थेप्रमाणेच मध्ययुगीन कालातील दुसरी उल्लेखनीय संस्था म्हणजे ग्रामसंस्था होय. ग्रामसंस्था ही एखाद्या गणराज्यासारखी असून त्यात पाची मुख्य जातींचे लोक एकमेकाशी सहकार्याने रहात.[३] खेड्यातील मुख्य व्यवसाय शेती असला तरी त्यास पूरक असे इतर व्यवसाय करणारेही लोक असत. एका गांवच्या लोकास गोत म्हणजे कुटुंबातील मंडळी असे नाव असे. हे गोत सामान्यतः खालील प्रमाणे असे.

(अ) वतनदार : पाटील, मुकादम, कुलकर्णी, चौगुले ह्यासारखे ग्रामसंस्थेने व राज्यसंस्थेने नेमलेले अधिकारी.

(आ) बलुतेदार अथवा ग्रामसंस्थेचा पिढीजाद नोकरवर्ग. ह्यात तीन रांगा असत.

पहिली रांग : सुतार, लोहार, चांभार, महार.

दुसरी रांग : कुंभार, न्हावी, परीट, मांग

तिसरी रांग : सोनार, जोशी, कुलकर्णी, गुरव.

(इ) मिरासदार : हे शेतकरी असत.

---

१. किंवा.

२. Cast & its structure–second edition–pages 51 to 53

३. वर्ण व जाती : पाने ५२ ते ५५








( ई ) उपरी प्रजा किंवा राया : हे कामकरी म्हणून खेडेगावात रहात. प्रत्येक गावच्या पंचायतीत ब्राह्मण ( कुलकर्णी, जोशी ), क्षत्रिय ( मुकादम, पाटील, चौगुले ), वैश्य ( मिरासदार व सोनार ), शूद्र ( सुतार, लोहार, परीट, न्हावी, गुरव ) व अपृश्य ( महार, चांभार, मांग ) अशा पाचही जाती असत. ह्या पंचायतीत ब्राह्मण किंवा वरच्या वर्गास काहीही विशिष्ट अधिकार नव्हते. तसेच ह्या पंचायतीचा अधिकार गावातील ब्राह्मणांसकट सर्व कुटुंबांवर चालत असे. गावातील ह्या निरनिराळ्या जातीत बंधुत्वाची भावना होती. व संकटांचा सर्व जाती एकजुटीने प्रतिकार करीत. मोरोपंतांच्या गंगा-वकिली नावाच्या स्फुट कवितेत आपल्या गांवातील, ब्राह्मण, मराठे, वाणी, कुंभार, परीट, न्हावी, सुतार, महार व मुसलमान ह्या सर्वांची पातके गंगेने धुवून काढावी अशी कवीने प्रार्थना केली आहे.

( ६ ) अशा प्रकारे मध्ययुगीन काळात जातिसंस्था व ग्रामसंस्था हे आपल्या समाजाचे विशेष होते. इतर मध्ययुगीन समाजांच्या तुलनेने बऱ्याच बाबतीत मध्य-युगीन भारत पुढारलेला व उदारमतवादी होता. इतर सरंजामशाहीमधील दासवर्गास ( serfs ) आपल्या इकडल्यासारखे जातिसंस्थांचे व ग्रामसंस्थांचे संरक्षण नव्हते. ह्या दोन्ही संस्थांच्या ऐतिहासिक फायद्या-तोट्यांची यादी खालीलप्रमाणे करता येईल :

अ ) जातिसंस्थेमुळे व ग्रामसंस्थेमुळे आपल्या समाजातील प्रत्येक घटकाला दोन स्नेहशील अशा छोट्या गटांचा आसरा मिळाला. ह्या दोन्ही संस्थां-कडून त्याला संकटाच्या व दारिद्र्याच्या काळात मदत मिळत असे. त्याच्या धर्माचे, धंद्याचे व आचारविचा-रांचे शिक्षण मिळत असे. त्याच्या कुटुंबास व मुलांसही ह्या दोन संस्थांचा मोठाच आधार असे.

आ) जातीमुळे धार्मिक व बऱ्याच प्रमाणात सामाजिक दर्जाही ठरत असे. पण त्यामधेही लवचीकता होती. आपल्या परंपरागत व्यवसायाशिवाय इतर अनेक व्यवसायही काही थोडीशी बंधने पाळून जातीस करता येत असत. जातींचा आर्थिक, राजकीय अथवा सामाजिक दर्जा काही कारणाने उंचावला तर त्या जातीस वर्णव्यवस्थेमधे वरचे स्थान प्राप्त करून घेता येत असे. जातीतला काही भागच पुढारलेला असेल तर त्या पुढारलेल्या भागाची उपजात होऊन पुढे त्या उपजातीस वरचे स्थान प्राप्त होत असे. ग्रामपंचायतीच्या कारभारात सर्व जातींत समानता असे.

इ) जातिसंस्थांचे व ग्रामसंस्थांचे आपल्या सदस्या-वर वजन असे. त्यामुळे त्यास राजसत्तेच्या आधारा-शिवाय समाजाचे नियमन करता येत असे.

ई) ह्या संस्थांना स्वतःचे कायदे करण्याचे स्वातंत्र्य होते व त्यात राजसत्तेची ढवळाढवळ होत नसे. म्हणून हल्लीच्या लोकशाहीपेक्षा जातिव्यवस्थेत प्रजाप्रभुत्व जास्ती प्रमाणात होते असे म्हणावे लागते.

उ ) ह्या संस्था सरंजामशाहीच्या जवळ जवळ ३००० वर्षांच्या काळात सुरळीतपणे चालू होत्या. वंशभेद, धर्मभेद, भाषाभेद, अशा शेकडो भेदांना सामावून घेण्याची त्यामधे शक्ती होती. भारतातील बहुरंगी समाजास त्या अत्यंत अनुरूप होत्या.

ऊ ) जातिभेदामुळे समाजाचे विघटन होते असे मत हल्ली प्रचारात आहे. पण ऐतिहासिक दृष्ट्या असे दिसते की एका प्रचंड भूखंडांतील विविध जमातींचे जाती व ग्रामसंस्थानी ऐक्य घडवून आणले आहे. सामाजिक ऐक्याच्या दृष्टीने ह्या दोन संस्था परस्परास पूरक होत्या असे दिसते. कारण जातीमधे समव्यवसायी लोकांशी संबंध येत असे तर ग्रामामधे इतर व्यवसायातील लोकांशी संबंध येत असे.

ए ) राजकीय सत्ता मध्यवर्ती सत्तेमधे केंद्रित न होता देशभर पसरलेल्या ह्या दोन छोट्या गटात विखु-रली गेल्यामुळे ह्या देशास बऱ्याच प्रमाणात राजकीय व आर्थिक स्थिरता प्राप्त झाली. मध्यवर्ती राजसत्तेत मोठे बदल झाले तरी जातिसंस्था व ग्रामसंस्था तशाच चालू रहात व त्यांच्या आधारामुळे लोकास सुरक्षितता वाटत असे. संकटात गावातले व जातीचे लोक एकत्र येऊन एकमेकांचे संरक्षण करीत.

ह्याच बरोबर ह्या दोन संस्थांचे काही तोटेही होते, ते खालीलप्रमाणे:—

ओ ) समाजाची छोट्या छोट्या गटात विभागणी झाल्याने परकीय आक्रमणाचा सुसंघटित प्रतिकार करणे भारतीयास अवघड गेले.

क) अस्पृश्यता, वर्णसंकर, सती जाणे ह्यासारख्या अतिरेकी धर्मकल्पनास ह्या दोन संस्थांचे पाठबळ

मिळाले व त्यांच्या समाजावर असलेल्या वजनामुळे अशा चाली विरुद्ध लोकमत लवकर जागृत झाले नाही.

ख) जातींच्या उच्चनीचतेच्या कल्पनेला कर्मविपाक व पुनर्जन्म ह्या कल्पनांची जी तात्विक बैठक मिळाली तिचा विचित्र परिणाम झाला. स्वतःची स्थिती सुधारण्याचा प्रयत्न करण्याची प्रवृत्ती कमजोर झाली व सर्व समाजास पक्षघातासारखी धोकादायक स्थिरता प्राप्त झाली.

ग) पेंढाऱ्यासारख्या काही गुन्हेगारी जमातींच्याही जाती झाल्या व गुन्हेगारी हा आपला जातिधर्म पाळण्याचे त्यास स्वातंत्र्य आहे अशी ही चमत्कारिक कल्पना त्याकाळी होती.

(७) मध्ययुगातील सरंजामशाहीमधे आपल्या बहुरंगी समाजाचे चित्र वरीलप्रमाणे होते. इंग्रजी अंमदानीपासून शतका दीड शतकांच्या अवधीत सरंजामशाही अर्थव्यवस्था नष्ट होऊन औद्योगिक अर्थव्यवस्था प्रस्थापित झाली आहे. ह्या आधुनिक काळात देखील बहुरंगी समाज, पितृप्रधान कुटुंबव्यवस्था व समाजातील निरनिराळ्या वर्गांचा श्रेष्ठकनिष्ठपणा ही वरती पाहिलेली तीन मूलभूत कारणे अस्तित्वात आहेतच. पण औद्योगिक अर्थव्यवस्थेच्या पार्श्वभूमीवर त्यांचे समाजावरील परिणाम थोडे निराळे होतात. ते कसे ह्याचा आता विचार करू.

अ) बहुरंगी समाज: सरंजामशाहीच्या काळात आपल्या बहुरंगी समाजाचे संघटन जातिसंस्था व ग्रामसंस्था ह्यामुळे झाले हे आपण पाहिले. आता नवीन काळात राष्ट्रवाद, मध्यवर्ती शासनसंस्था, अर्थव्यवस्थेचे एकीकरण व वाढलेले दळणवळण ह्या सर्वांमुळे समाज पूर्वीपेक्षा अनेक पटीने संघटित झाला आहे. पूर्वीची परंपरागत धर्मांची व जातीची बंधने आता नष्टप्राय होत असली तरी त्यामुळे फुटीरपणा वाढण्याची आता भीती नाही.

जातिभेदातील स्पर्शास्पर्शाचे, खाण्यापिण्याचे व सोवळ्या ओवळयाचे भेद दळणवळण वाढल्यामुळे हल्ली नष्ट झाले आहेत. अस्पृश्यता तर कायद्यानेच बंद झाली आहे. जातिपंचायतींचे महत्व नष्ट झाले आहे. जन्माने अजून जाती ठरत असल्या तरी त्यांचे परंपरागत व्यवसाय पुष्कळ लोक करीत नाहीत. विविध प्रकारचे व्यवसाय विविध प्रकारच्या जातीतील लोक करीत असल्याने व समाजशिक्षणामुळे जातीजातीतील श्रेष्ठकनिष्ठता लुप्तप्राय झाली आहे. असे असले तरी शरीरसंबंध बहुशः जात्यन्तर्गतच होतात.[१] लोकशाहीमधे जातिविशिष्ट गटांना राजकीय महत्वही प्राप्त झाले आहे. पुष्कळ जातींच्या अखिल भारतीय अथवा प्रांतिक संघटणा निर्माण झाल्या आहेत. ह्या कारणास्तव जातिसंस्था समूळ नष्ट होणे शक्य दिसत नाही.

खेड्यांचे महत्वही पूर्वीपेक्षा फारच कमी झाले आहे. आधुनिक काळात खेडी मध्ययुगासारखी स्वयंपूर्ण राहिली नाहीत. सुतार, न्हावी, लोहार, वैद्य, ह्यासारखे लोक खेड्याऐवजी मध्यवर्ती तालुक्याच्या गावी राहतात. अशा मध्यवर्ती गावाशी आसपासच्या खेड्यांचा बाजार चालतो. त्यामुळे मध्यवर्ती तालुक्याचे गाव व त्याभोवतालची खेडी असे नवे मोठे घटक आधुनिक समाजात आहेत.[२] ग्रामपंचायती आहेत पण त्यांचे महत्व पूर्वीपेक्षा फार कमी झाले असून, सर्वंकष मध्यवर्ती सत्तेच्या त्या आता छोटा बिनमहत्वाचा भाग बनल्या आहेत.

ग्रामसंस्था व जातिसंस्था ह्यांचा आधार नष्ट झाल्यामुळे व त्यांची जागा घेणाऱ्या दुसऱ्या संस्था अजून निर्माण न झाल्याने, आपल्या बहुरंगी औद्योगिक समाजातल्या सामान्य नागरिकात एकाकीपणाची व हतबलतेची भावना निर्माण झाली आहे. बहुरंगी समाजामधे (किंबहुना एकसंध समाजामधेही) गट करण्याच्या प्रवृत्तीस आळा घालणे शक्यही नसते व हितावहही नसते. उलट अशा प्रवृत्तीस नीट वळण लावणे सूज्ञपणाचे ठरते. समाजधारणेस परिपोषक व एकमेकास पूरक असे गट पूर्वीच्या जातिसंस्था व ग्रामसंस्था ह्यांच्या धर्तीवर केल्यास त्यामुळे समाजाचे विघटण न होता संघटणच होईल.

१. Hindu Society An Interpretation - Page 159.
२. Hindu Society An Interpretation - Page 162.








पूर्वीच्या दोन संस्थांची जागा आधुनिक अर्थ-व्यवस्थेत व्यवसाय संघ ( trade unions ) व तालुका परिषदा घेऊ शकतात. ह्या संस्थांची सध्याची घडण बहुरंगी समाजास अनुरूप नाही. त्यांचे अधिकारक्षेत्र फार मोठे असते व त्यांत सत्तेचे केंद्रीकरणही फार असते. लोकास त्यांबद्दल पूर्वीइतकी आत्मीयता वाटत नाही किंवा त्यापासून पूर्वीइतके स्नेहशील संरक्षणही मिळत नाही. आपल्या प्रचंड व विविध लोकसंख्येच्या समाजात अशा संस्थांची घडण गावागावावर आधारलेल्या छोट्या छोट्या गटांची बनलेली असावी ( Cellular Organisation ) व ह्या छोट्या छोट्या गटात सत्तेचे विकेंद्रीकरण व्हावे. आपल्या सर्वच राज्यकारभाराची यंत्रणा अशा छोट्या छोट्या गटांची बनणे आपल्या समाजास जास्ती अनुरूप आहे. असे केल्यास मध्यवर्ती सत्तेतील बदलांचा सामाजिक स्थैर्यावर कमी परिणाम होईल.

आ ) पितृप्रधान कुटुंबव्यवस्था हल्लीची कुटुंबसंस्थाही पूर्वीप्रमाणे पितृप्रधानच आहे. पण आता स्त्रियांचे स्वातंत्र्य पुष्कळच वाढले असून त्यांच्यात शिक्षणाचा प्रसारही झाला आहे. अनेकप्रकारचे व्यवसाय आता स्त्रिया करू शकतात. त्यामुळे पित्यावर, नवऱ्यावर अथवा मुलावर त्या आता पूर्वीइतक्या अवलंबून नसतात.

पितृप्रधान कुटुंबपद्धतीमुळे, शिशुसंगोपन व अन्नाराधन ही कुटुंबांच्या खाजगी क्षेत्रातली कामे आजही बहुधा स्त्रियाच करतात. ह्या कारणामुळे व मातृत्वाच्या जबाबदारीमुळे सामाजिक व्यवहारात भाग घेण्याच्या स्त्रियांच्या स्वातंत्र्यावर फार मोठी मर्यादा पडते. स्त्रियांच्या पातिव्रत्याच्या व शीलरक्षणाच्या कल्पनात अर्थव्यवस्थेतील बदलामुळे काहीही फरक पडलेला नाही. वर्गाची श्रेष्ठकनिष्ठता आधुनिक समाजातही आहे व मुलीच्या लग्नाच्या वेळी मुलाचा सामाजिक दर्जा आजही बघितला जातो. विधवाविवाह व पुनर्विवाह ह्यास जरी मान्यता मिळाली असली तरी काही दुर्दैवी व्यक्तींची सोय व्हावी एवढाच हेतू त्यात दिसतो. ह्या चालींचा सर्रास अंगिकार होत नाही.

सारांश, स्त्रियांचे स्वातंत्र्य वाढले असले तरी पितृप्रधान कुटुंबपद्धतीतून निर्माण होणाऱ्या मर्यादा आधुनिक स्त्रीलाहि पाळाव्या लागतात.

(इ) वर्गाच्या श्रेष्ठकनिष्ठत्वाची कल्पनाः– मध्ययुगीन काळातील बहुरंगी समाजात परंपरागत धंदे चालविणाऱ्या जाती निर्माण झाल्यामुळे, त्या समाजातील आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक वर्गही जन्मजात वर्ण झाले हे आपण मागे पाहिले. औद्योगिक समाजातहि आडवेउभे वर्ग ( Horizontal & Vertical Divisions ) असतात असे आधुनिक समाजशास्त्रज्ञ मानतात. पूर्वापार सवयीमुळे हिंदू माणूस आधुनिक समाजाचेही राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक बैठकीवर चार वर्ग पाडतो. पण हल्ली जन्मावरून व्यवसाय ठरत नसल्याने त्या वर्गांचे जन्मजात वर्ण मात्र होत नाहीत. पूर्वीप्रमाणेच व्यवसायावरून समाजातील आर्थिक, राजकीय अथवा सांस्कृतिक स्थान ठरत असल्यामुळे, आजच्या व्यवसायांचे मात्र चार वर्ग पाडता येतात.

बर्ट्रांड रसेल ह्या तत्वज्ञाच्या म्हणण्याप्रमाणे सर्व समाजात, सर्व काळी तीन प्रकारचे संघर्ष असतात.[१] (१) माणसातील व निसर्गातील संघर्ष ह्याचे स्वरूप आर्थिक असते (२) माणसामाणसांतील संघर्ष– हा राजकीय स्वरूपाचा असतो. (३) माणसाच्या मनातील बौद्धिक व भावनिक संघर्ष–हा मध्ययुगीन काळात धार्मिक स्वरूपाचा होता. ह्या तीन प्रकारच्या संघर्षांच्या कल्पनेबरोबरच व्यक्तीव्यक्तीत संस्कारामुळे निर्माण होणारी विषमता हीही लक्षात घेतली पाहिजे. संस्कारांची विषमता ही जन्मजात बुद्धी, कल, आर्थिक परिस्थिती, कौटुंबिक संस्कार, काही आनुषंगिक स्वभावगुण अथवा दोष व शेवटी दैव अशा विविध गोष्टींवर अवलंबून असते व त्या सर्वांमधे समानता आणणे माणसाच्या शक्तीबाहेर आहे. अशा सांस्कारिक विषमतेमुळे व वरती सांगितलेल्या तीन प्रकारच्या सामाजिक संघर्षामुळे आर्थिक, राजकीय व बौद्धिक अथवा कलाक्षेत्रात काही व्यक्ती इतरांपेक्षा पुढे येतात. अशा पुढे आलेल्या व्यक्तींचे सामाजिक व्यवसाय विशिष्ट प्रकारचे असतात ह्या व्यवसायास सांस्कृतिक, आर्थिक अथवा राजकीय दृष्ट्या समाजात

१. New Hopes for a Changing world– 1951. edition– Page 18.










मानाचे स्थान असते. त्यामुळे ह्या व्यवसायांचे वर्ग बनतात. उच्चप्रकारचे व्यवसाय करणाऱ्या लोकांच्या आचारविचारात, राहणीत, विवाहसंबंधात व अपत्यांच्या शिक्षणात विशिष्टता येते. मनदानासारखे काही राजकीय अधिकार, समान कायदे व थोड्या आर्थिक व शैक्षणिक सवलती देऊन समता आणण्याचा प्रयत्न केला जातो पण प्रत्यक्ष व्यवहारात मोठ्या प्रमाणात विषमता असते, व ती वर्गाधिष्ठित असते. चातुर्वर्ण्याचे आजच्या युगातले तात्त्विक स्वरूप वरीलप्रमाणे असून ते भांडवलशाही व समाजवादी ह्या दोन्ही प्रकारच्या समाजाना लागू आहे.

काही ऐतिहासिक कारणामुळे आधुनिक भारतीय समाजात दोन ठळक वर्ग तावडतोब दिसून येतात. इंग्रजी भाषा शिकलेल्या लोकांचा वर्ग इतरापासून एकदम निराळा दिसतो. आपल्या धार्मिक परिभाषेप्रमाणे पूर्वीचे संस्कृत शिकणारे द्विज हे आधुनिक आंग्लविद्याविभूषितांचे पितर आहेत. पूर्वीच्या उच्च जातीतील लोकांचा इंग्रजी जाणणाऱ्या समाजात मोठा भरणा असला तरी आज त्यात बरीच सरमिसळ झाली आहे. समाजातील सर्व महत्त्वाच्या व्यवसायांवर ह्या लोकांचे प्राबल्य आहे. त्यांच्या आचारविचारात व राहणीत विशिष्टता आहे. इंग्रजी न येणाऱ्या अशिक्षित माणसास आपल्या मुली देण्यास ते नाखूष असतात. त्यांची मुलेबाळेही इंग्रजीतून उच्च शिक्षण घेऊन वडलांप्रमाणेच मानाचे सामाजिक व्यवसाय करतात. शिकलेला पण गरीब पांढरपेशा वर्ग हा ह्या नवद्विज वर्गाचाच एक कमी दर्जाचा भाग समजला जातो.

इंग्रजी न जाणणाऱ्या लोकांमधे पूर्वी शूद्र गणले जाणारे कारागीर व कामगार मोठ्या प्रमाणात आहेत. शेती व कारागिरीच्या धंद्याचे आता यांत्रिकीकरण झाले आहे. त्यामुळे पूर्वीचे शूद्र हे हल्लीच्या कामगारांचे पितर म्हटले पाहिजेत. कामगाराना धंद्यात शिरण्याआधी शालेय अथवा महाविद्यालयीन शिक्षण घेण्याची जरूर नसते. म्हणून कामगारवर्गात शिक्षणाचा प्रसार झाला तरी बहुसंख्य कामगार उच्च शिक्षण घेत नाहीत. कोणी उच्च शिक्षण घेतलेच तर तो लगेच नवद्विज बनतो. शालान्त परीक्षा म्हणजे आजचे उपनयन आहे!

लोकशाहीतील आणखी एक वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट म्हणजे भरपूर पैशाचे पाठबळ असलेला माणूसच निवडणुकीस उभा राहू शकतो हे होय. म्हणजे आपल्या धार्मिक परिभाषेप्रमाणे राज्यसत्तेवर वैश्य लोकांचा मोठा पगडा आहे. धनिकांचे साहाय्य घेतल्याशिवाय मोठमोठ्या राजकीय पक्षांचाही निभाव लागत नाही. कामगारवर्गाने व्यवसायसंघासारखे गट केल्यामुळे त्या वर्गाचा थोडाफार प्रभाव पडतो पण पैशाच्या लालुचीने त्यामधेही फूट पाडता येते. अध्ययन, अध्यापन, संशोधन, न्यायदान व उच्च शिक्षण लागणारे काही इतर व्यवसाय करणारे द्विज मुख्यतः पगारी नोकर असतात. त्यांच्या ज्ञानाचा समाजास उपयोग होतो पण राज्यसत्तेवर त्यांचा फारसा प्रभाव पडत नाही.

समाजामधे राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक विषमतेमुळे आडवे वर्ग पडतात ही वस्तुस्थिती समतेच्या तत्त्वाला विरोधी असल्यामुळे दुर्लक्षिली जाते[१] अथवा झुरळाप्रमाणे झटकून टाकली जाते हे समाजशास्त्राचे दुर्दैव होय. समतेच्या तत्त्वाची मूळ कल्पना प्रत्येक गटास व व्यक्तीस न्याय देणे ही आहे. पण त्यास समता हे चुकीचे नाव दिले गेले आहे. वास्तविक विषमतेमुळे आडवे वर्ग निर्माण होतात हे मान्य करून मात्स्यन्याय म्हणजे शक्तिमान वर्गाकडून दुर्बल वर्गाच्या होणाऱ्या शोषणास पायबंद घालणे हा वैवस्वत मनूचा विचार वस्तुस्थितीस अनुरूप आहे. मात्स्यन्यायापासून समाजाचे रक्षण करावयाचे असेल तर निरनिराळ्या व्यवसायांच्या सामाजिक, आर्थिक व राजकीय दर्जानुसार त्यांचे गट पाडून त्यावर सर्व गटांचे प्रतिनिधित्व असणाऱ्या मध्यवर्ती संस्थेने नियंत्रण ठेवले पाहिजे.

सारांश आधुनिक अर्थव्यवस्थेत व्यवसायसंघ व तालुकापरिषदा पूर्वीच्या जातिसंस्था व ग्रामसंस्था ह्यांची जागा घेऊ शकतील पण त्यांची घडण गांवागांवावर आधारलेल्या लहान लहान गटावर उभी केल्यास व ह्या लहान गटात सत्तेचे विकेंद्रीकरण केल्यास ते आपल्या बहुरंगी समाजास अनुरूप होईल. ह्या समाजातील प्रत्येक गटास व व्यक्तीस न्याय द्यायचा असेल तर औद्योगिक समाजात निर्माण होणाऱ्या आडव्या वर्गास दुर्लक्षून चालणार नाही. सांस्कृतिक, आर्थिक व राजकीय दर्जानुसार निरनिराळ्या व्यवसा-

१. पहा : Anthropology by kroeber page 269.








यांचे वर्ग पाडून त्यावर नियंत्रण ठेवल्यास न्यायावर आधारलेला समाज उभारणे सुलभ जाईल.

(८) बहुरंगी समाज, पितृप्रधान कुटुंबपद्धती व वर्गातील श्रेष्ठकनिष्ठता ह्यांच्या एकत्रित परिणामामुळे मध्ययुगात निर्माण झालेल्या आपल्या समाजातील कोणता भाग नव्या औद्योगिक अर्थव्यवस्थेत त्याज्य ठरवावा, कोणता ठेवावा व आपल्या इतिहासापासून कोणता बोध घ्यावा हे समजण्यास वरील विश्लेषणाचा उपयोग होईल अशी आशा आहे.

**संदर्भ ग्रंथ**


(१) Caste in India (Oxford University Press- second Edition) by J. H. Hutton.

(२) वर्ग व जाती (विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, प्रथमावृत्ती) लेखक : कै. डॉ. मो. वि. पटवर्धन.

(३) Hindu Society- An Interpretation (Deccan College, Poona-1961 edition) by Dr. Iravati Karve.

(४) मनुस्मृति (चित्रशाळा प्रेस-शके १८४९), भाषांतरकार : कै मुकुंद गणेश मिरजकर.








अनुक्रमणिका








डॉ. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# मराठी साम्राज्यसत्तेमागील हेतु

फेब्रुवारी ६९ च्या नवभारताच्या अंकात वरील शीर्षकाखाली श्री. आठवले यांचा एक लेख प्रकाशित झाला आहे. मराठी सत्ता ही नुसती लुटारूंची होती हा जुनापुराणा आरोप त्यात पुनः उगाळला आहे. या आरोपावर सुरवातीला न्यायमूर्ति रानडे व त्यानंतर अनेक इतिहासकारांनी सप्रमाण उत्तर दिलेले आहे. या सर्व उत्तरात उल्लेखनीय उत्तर म्हणजे डॉ. सुरेन्द्रनाथ सेन यांनी लिहिलेला Maratha Administration हा ग्रंथ होय. आठवले आपला आरोप उगाळताना या ग्रंथातील विवेचनाचा समाचार घेतील अशी माझी अपेक्षा होती. पण डॉ. सेनांच्या कोणत्याही मुद्द्याला त्यांनी स्पर्श देखील केला नाही. डॉ. सेनासारख्यांच्या मान्य ग्रंथातील प्रमाणांचा विचारही न करणाऱ्या लेखाची दखल घेण्याची फारशी जरूर नाही असे मला लेख वाचल्यावर वाटले. पण आता प्रा. आचार्य यांनी त्याची दखल घेतली आहे व आठवल्यांनी आचार्यांना उत्तरही (नवभारत, जुलै ६९) दिले आहे. याप्रमाणे चर्चेस तोंड फुटले असल्यामुळे आठवल्यांच्या उत्तरावर मीही चार शब्द लिहितो.

## मोगल व इंग्रज लुटारू

(१) मराठ्यांनी केलेल्या लुटीच्या शतपट लुटी मोगल व इंग्रज यांनी केल्या, "फौजेला तीन दिवस लुटीची परवानगी दिली," अशासारखे उल्लेख इंग्रजी कागदपत्रात सापडतात. या मुद्द्याबद्दल आठवले म्हणतात "मग इतरात व मराठ्यात फरक काय? व त्यांच्या सत्तेचा अभिमान काय म्हणून बाळगायचा?"

या प्रश्नात दोन मुद्दे अनुस्यूत आहेत. मूळ मुद्दा मराठी सत्ता लुटारू होती की नाही हा. याचे उत्तर स्पष्ट आहे. मराठी सत्ता लुटारू असेल तर मोगल व इंग्रजी सत्ता तिच्या शतपट लुटारू होती असे त्याचप्रकारच्या अनुमानपद्धतीने सिद्ध होते. मराठ्यांना लुटारू म्हणणारे इंग्रजांना लुटारू म्हणायला तयार असतील तर ते सुसंगत विवेचक आहेत असे म्हणता येईल. मराठे लुटारू होते असा सतत उद्घोष करून मोगल व इंग्रज यांच्या तत्सदृश कृत्याबद्दल मूग गिळल्याने मोगल व इंग्रज लुटारू नव्हते असा ध्वनि निघतो. म्हणून मराठ्यांचे निंदक सत्यनिष्ठ असतील तर त्यांनी मोगल व इंग्रज यांच्या लुटारूपणाचेही सविस्तर वर्णन करायला हवे. मराठ्यांच्या लुटारूपणाबद्दल इंग्रजांनी भरपूर गवगवा आधीच करून ठेवलेला आहे. आज खरी गरज आहे मोगल व इंग्रज यांच्या लुटारुपणाला प्रसिद्धि देण्याची.

(२) दुसरा मुद्दा : मराठ्यांच्या सत्तेचा अभिमान का बाळगायचा?

गझनीपासून औरंगजेबापर्यंतचा पराभवाचा इतिहास त्यांनी बदलला म्हणून. भारतीय हे पौरुषहीन लोक आहेत, त्यांना कुणीही लाथा माराव्या अशी भारताची दुष्कीर्ति शिवाजीच्या उदयापूर्वी साऱ्या जगात झाली होती. इतकेच नव्हे तर भारतीयातही आपण षण्ढ आहोत असा गण्ड निर्माण झाला होता. माणसात जेव्हा स्वतःबद्दलच तुच्छतेची भावना निर्माण होते तेव्हा त्याचा सर्वांगीण अधःपात निवारण करायला काहीच उपाय उरत नाही. साधारणपणे तेराव्या शतकापर्यंत भारत, संपत्ति, कलाकौशल्य, विज्ञान व पराक्रम वगैरे सर्व बाबतीत जगात अग्रेसर होता, निदान कोणत्याही तत्कालीन राष्ट्रांच्या मागे नव्हता. तेराव्या शतकानंतर सर्व क्षेत्रात भारताच्या अधःपाताला सुरवात झाली. याचे कारण रणांगणावर सतत होणारा पराभव व यामुळे उत्पन्न होणारी सत्वशून्यता.

युद्धातील पराजय हे भारताच्या अवनतीचे कारण नसून अवनति हेच पराजयाचे कारण आहे असे कधी कधी म्हणण्यात येते, पण ते खरे नाही. भारतीयांचा युद्धात पराभव करणारे तुर्क, अफगाण व मोगल हे त्यांच्यापेक्षा अधिक विज्ञानसंपन्न, अधिक कलाभिज्ञ व अधिक समृद्ध होते असे सिद्ध करता येणार नाही. आज सामरिक सामर्थ्याचा व विज्ञानाचा जसा अभेद्य








संबंध स्थापित झाला आहे तसा प्राचीन काळी वा मध्ययुगात नव्हता. ग्रीक लोक रोमन लोकांपेक्षा अधिक विज्ञानसंपन्न होते. आर्किमिडीझसारख्या धुरंधर ग्रीक वैज्ञानिकाने रोमशी लढताना आपले सारे वैज्ञानिक ज्ञान पणाला लावले होते. असे असून रोमन लोकांनी ग्रीकांचा सहज पराभव केला. तेव्हा मध्ययुगातील भारतीयांच्या सैनिक पराभवावरून त्यांचे शत्रु त्यांच्यापेक्षा अधिक प्रगत होते असे अनुमान काढणे चूक आहे.

सारांश सतत होणारा सैनिक पराभव हा भारतीय राष्ट्राला झालेला मुख्य रोग होता. शिवाजी व त्याचे उत्तराधिकारी यांनी याच रोगावर यशस्वी उपचार केला. भारतीय मार खाऊ व निर्वीर्य आहेत हे पूर्ण सत्य नाही, निर्वीर्यता ही आमच्या राष्ट्राला आलेली तात्कालिक ग्लानि आहे, २६ परकीय घोडेस्वारांनी कलिंगाचे राज्य काबीज केले हे भारतीय इतिहासातले सत्य आहे तसेच लक्षावधि फौज घेऊन आलेल्या शाइस्तेखानाचा तीन चारशे घोंगड्या मावळ्यांच्या साहाय्याने एका पराईतल्या पोराने धुव्वा उडविला हेही भारतीय इतिहासातले सत्य आहे, अल्लाउद्दीनसारख्या उनाड पोराने मोठमोठी भारतीय राज्ये चुटकीसरशी धुळीस मिळविली हे जसे खरे तसेच चार पाच लक्ष फौज घेऊन व तत्कालीन जगातील अतिबलाढ्य साम्राज्याचे सर्व बळ एकवटून औरंगजेबासारखा शत्रु चालून आला असता, कोणत्याही दुसऱ्या सत्तेची मदत नाही, पराभव झाल्यावर मागे सरकायला भूमि नाही, अशा दुर्धर परिस्थितीत त्याच्याशी पंचवीस वर्षे झुंज घेऊन मूठभर मराठ्यांनी त्याला "गर्दीस मेळविला" हेही खरे आहे; पाश्चात्यांच्या कवाइतबाज व अग्निशस्त्रांनी सज्ज अशा सैन्यापुढे भारतीयांचे बल अग्निज्वालेवरील शलभाप्रमाणे क्षणात नष्ट झाले हा भारतीय इतिहास आहे त्याचप्रमाणे कान्होजी आंग्र्याने समुद्रपुत्र म्हणविणाऱ्या इंग्रजांचा समुद्रावर पराभव केला, व नाना व महादजी यांनी इंग्रजांना दाती तृण धरून शरण आणले हाही इतिहास भारतीयच आहे, असे आशास्थान मराठ्यांनी निर्माण केले ही त्यांची कामगिरी अनमोल आहे. सर्व भारतीय मराठ्यांचा अभिमान बाळगतात तो यासाठीच. परकीयांच्या प्रचारकी लिखाणातील सर्व आरोप खरे मानले तरी मराठ्यांची उरलेली कामगिरी महनीयच ठरते. यामुळेच परकीयांचा व त्यांची पोपटपंची करणाऱ्या इतरांचा सारा प्रचार भारतीयांच्या मनातील मराठ्यांबद्दलचा आदर नष्ट करण्यास समर्थ ठरला नाही. पाकिस्तानी व चीनी आक्रमकांनी भारतभूमीचे नरडे दाबण्याचा प्रयत्न केला तेव्हा शिवाजी महाराजांच्या स्मृतीनेच साऱ्या राष्ट्रात स्फूर्तीचा संचार केला व भारतीय नभोवाणीवर "हरहर महादेव" ही गर्जना ऐकू येऊ लागली. भारतीयांनी मराठ्यांच्या इतिहासाचा अभिमान का बाळगला पाहिजे असे विचारणारे भारताच्या भावजीवनापासून पारखे झालेले आहेत हे स्पष्ट आहे.

## भाऊ व बेण्टिंग

भाऊसाहेबांनी दिल्लीचे मोगली छत फोडले याबद्दल आठवल्यांनी हळहळ व्यक्त केली आहे. वस्तुतः मराठे दिल्लीचे स्वामी झाले म्हणून त्यांनी दिल्लीतील पारतंत्र्याचे अवशेष टिकू द्यावला पाहिजे होते असे ठरत नाही. शिवाय कोणत्याही काळच्या युद्धनीतीप्रमाणे जितांच्या सम्पत्तीवर जेत्याचा अधिकार पोचतो. चान्दीचे छत फोडून राष्ट्ररक्षणाच्या कार्याला मदत होत असेल तर ते फोडण्यात भाऊसाहेबांनी उचितच वर्तन केले असे म्हटले पाहिजे, इंग्रजांनी देखील जुन्या इमारतीतील मूल्यवान् वस्तु धुवून नेल्या. बेण्टिगने तर ताजमहालाचे दगडच लिलावाला काढले होते. पण पुरेशी किंमत न मिळाल्यामुळे ताजमहाल जमीनदोस्त होण्याचे वाचले. दिल्लीच्या इतिहासपरिषदेत या विषयावर एक निबन्ध वाचण्यात आला होता. त्यात इंग्रजांच्या लुटारूपणाचे अनेक मासले वर्णिले आहेत.

पण महाराष्ट्रीयांना इंग्रजी लुटारूपणाचे मासले पाहण्यासाठी इतके दूर जाण्याची जरूर नाही. इंग्रजांनी महाराष्ट्रातील किल्ल्यावरील इमारती जमीनदोस्त केल्या, त्यांच्या पायाचे दगडदेखील उरू दिले नाहीत. या रानटी कृत्याचे "किल्ला लष्करी दृष्ट्या निकामी केला" असे सोज्वळ वर्णन करण्याची सुसंस्कृतता मात्र त्यांनी दाखविली.

( ३ ) रजपुतांनी मराठ्यांशी आमरण वैर धरले हा आठवल्यांचा ग्रह निराधार आहे. छत्रसाल व जयसिंग हे मराठ्यांचे मित्र होते, पुढे मराठे व रजपूत यांच्या कटकटी झाल्या हे खरे असले तरी तेवढ्या-

वरुन निरपवाद वैराचा आरोप सिद्ध होत नाही. मराठ्यांचे व रजपुतांचे पूर्ण सख्य स्थापित होऊ शकले नाही ही गोष्ट मराठ्यांप्रमाणेच रजपुतांनाही लांछनास्पद आहे. मराठ्यांच्या लुटी हे या निराशाजनक परिस्थितीचे कारण म्हणता येत नाही हे प्रा. आचार्य यांनी सप्रमाण दाखवून दिले आहे. आठवल्यांना त्यावर मुळीच उत्तर देता आले नाही.

## माधवराव व लिंकन

(४) मराठे स्वतःच्याच मुलुखाची लूट करीत, असे एक निराधार विधान आठवल्यांनी आपल्या लेखात ठोकून दिले होते. याचे त्यानी एकही उदाहरण दिले नाही. व आता उलट प्रा. आचार्यांनाच ते याविरुद्ध प्रमाण मागत आहेत. मुळातल्या भरमसाट विधानावर सारवासारव करण्यासाठी मराठ्यांच्या आपसातील लढायांचे उदाहरण त्यांनी दिले आहे. पेशव्यांच्या भोसल्याशी व होळकराशी लढाया झाल्या. त्यात दोघांनीही एकमेकांचे मुलुख लुटले. पण स्वतःच्या राज्यातले मुलुख लुटल्याचे हे उदाहरण नाही. मराठमण्डळ हे एक संघराज्य होते. पानिपतच्या आघातानंतर त्याची एकजूट भंगली व त्याचे घटक अनेकवेळा सार्वभौम सत्तेप्रमाणे वागले, अर्थात् एका घटकाची दुसऱ्या घटकाशी लढाई झाली तेव्हा त्याने दुसऱ्याच्या ताब्यातील मुलुख लुटला. पण लिंकनने दक्षिण अमेरिकेतील घटक राज्यावर सैन्य पाठविले तेव्हा दुसरे काय केले ? उत्तर अमेरिकेतील सैनिकांनी दक्षिण अमेरिकेत केलेली जाळपोळ व लुटालूट यांचे रसभरीत वर्णन करून लिंकनला लुटारू ठरविणे सहज शक्य आहे.

मराठ्यांनी स्वतःच्या राज्यात कधीच लुटालूट केली नाही या विधानाचा प्रतिवाद करण्यासाठी मराठ्यांचे स्वतःचे असे राज्य कोणत्याच प्रदेशावर नव्हते असे दुसऱ्या कोणत्याही इतिहासकाराने न केलेले विधान आठवल्यांनी ठोकून दिले आहे. C. Collin Davies याच्या ऐतिहासिक मानचित्रावलीत मराठ्यांच्या अमलाखालील मुलुख स्पष्टपणे दाखविला आहे. एखाद्या मराठी राज्यकर्त्याने स्वतःच्याच अमलाखालील मुलखात लुटालूट केल्याचे उदाहरण आठवल्यांनी दाखवून द्यावे. आठवले " पेशव्यांच्या फौजेने केलेल्या नासधुशीचा " उल्लेख करतात. पण अशा नासधुशीने झालेल्या नुकसानीबद्दल पेशवे पायमल्ली नावाची भरपाई देत असत. याबद्दल डॉ. सेन यांनी साधार विवेचन केले आहे त्याचा आठवल्यांना सोइस्कर विसर पडला आहे.

## देशी राज्यकर्ते

(५) देशी संस्थानिकांनी राज्य कसे केले याबद्दल आठवल्यांनी ठरीव साच्याचे उद्गार काढले आहेत. देशी राजांच्या अमलाखालील मुलुख ब्रिटिश भारतापेक्षा प्रतिव्यक्ति उत्पन्न, आरोग्यमान, साक्षरता व सुव्यवस्था याबाबतीत कमी प्रगत होता असे आकड्यानिशी आठवल्यांनी सिद्ध करुन दाखवावे अशी माझी त्यांना विनंति आहे. भारतामधील सर्वाधिक साक्षरता एका संस्थानात म्हणजे त्रावणकोरमध्ये होती, भारतातील सर्वोत्तम धरणयोजना एका संस्थानात म्हणजे म्हैसूरमध्ये होती व आजही आम्हाला जे व्यवहारात आणता आले नाही ते देशी भाषेतून विद्यापीठीय शिक्षण एका संस्थानाने म्हणजे हैदराबादने प्रत्यक्षात आणले होते. संस्थानिकांची राजवट मागासलेली होती हा ग्रह काहीसा ब्रिटिश प्रचार व काहीसा मार्क्सवादी भाकडकथेतील सरंजामशाही हे प्रकरण यातून उद्भवला आहे.

संस्थानिक आजही आपल्या पूर्वीच्या प्रजेला पूज्य वाटतात या आचार्यांच्या यथार्थ विधानाद्दल "मी काय भाष्य करणार " म्हणून आठवले संभ्रान्त झालेले आहेत. खरेच, त्यांच्या ब्रिटिश प्रचारवादात यावर भाष्य करण्यासारखे काही असणेच शक्य नाही. लोकशाहीने लोकप्रियता हा राज्यकर्ता होण्यास निर्णायक असा गुण मानला आहे. या निकषावर एतद्देशीय राज्यकर्त्यांनी आपली पात्रता पूर्णपणे सिद्ध केली आहे. त्यांच्या राज्यात त्यांचा निवडणुकीत पराभव करणे अशक्य समजले जाते हे सत्य ब्रिटिश प्रचारात बसवून दाखविणे अशक्य आहे. आठवल्यासारख्या लेखकांना त्याचा बोध होऊ नये हेही साहजिकच आहे.

(६) परकीयांच्या स्तुतीने मराठे मोठे ठरवायचे तर त्यांच्या निन्देने ते निन्द्य का ठरू नयेत असे आठवले विचारतात. याचे उत्तर कोणताही वकील देईल. शत्रूने दिलेल्या साक्षीत प्रतिकूल भागापेक्षा



अनुक्रमणिका






अनुकूल भाग अधिक ग्राह्य समजला जातो. मराठ्यांच्या या शत्रुराष्ट्रात देखील मराठ्यांचे गुण ओळखणारे निघाले हा पुरावा महत्त्वाचा आहे.

### मांडिली मोडिली क्षेत्रे

( ७ ) आठवल्यांच्या मते काशी प्रयागादि स्थाने सुटली पाहिजेत ही मराठ्यांची तळमळ भोळेपणाची होती. भोळेपणा म्हणजे धडधडीत असत्यावर देखील विश्वास ठेवण्याची प्रवृत्ति या त्या शब्दाच्या सर्वसंमत अर्थानुसार प्रचारकी परकीयांच्या लिखाणावर अंधपणे विश्वास ठेवणाऱ्या आठवल्यांच्या वृत्तीला भोळेपणा हा शब्द यथार्थतेने लागू होतो. काशीप्रयाग सोडविण्याच्या तळमळीला तो कसा लागू होतो हे मात्र कळत नाही. काशीप्रयाग ही स्थाने शेकडो वर्षांपासून भारतीयांनी पवित्र मानलेली आहेत. भारतीय समाजाचे हे मानबिंदु आहेत हे परकीय आक्रमकांनी देखील ओळखले होते व म्हणूनच या राष्ट्राचा पूर्णपणे मानभंग करण्यासाठी औरंगजेबाने काशी–विश्वेश्वराच्या देवळाचा विध्वंस केला. त्याच्यापूर्वी बाबराने अयोध्येतील श्रीरामाचे जन्मस्थान उध्वस्त केले होते, शेरशहाने पांडवांच्या प्रासादांचा नाश केला होता व जहांगीर शहाजहान प्रभृतींनी हीच परंपरा पुढे चालवली होती ( भाऊसाहेबांनी दिल्लीचे तख्त फोडले म्हणून खन्त करणाऱ्या आठवल्यांना परकीय आक्रमकांची ही कृत्ये "धर्मातीत" "पुरोगामी" वगैरे वाटत असल्यास मला आश्चर्य वाटणार नाही. ) भारतीयांनी पवित्र मानलेली स्थाने नष्ट करणे हे मध्ययुगातील परकीय आक्रमकांचे धोरणच होते. या आक्रमणांचा यशस्वी प्रतिकार करणे म्हणजे समर्थांनी म्हटल्याप्रमाणे मोडलेली क्षेत्रे पुनः मांडणे आवश्यकच होते. विश्वेश्वर हा देव खरा की खोटा हा प्रश्न सर्वस्वी अप्रस्तुत आहे. राष्ट्रीय व राजकीय दृष्टीने, साऱ्या राष्ट्राच्या भावनांचे केंद्रीकरण करण्याचे त्यात सामर्थ्य होते ही गोष्ट महत्त्वाची आहे. भारताचा राज्यकर्ता आस्तिक असो की नास्तिक, हिंदु असो की अहिंदु, तो जर राष्ट्रीय राज्यकर्ता असेल, – परकीय आक्रमक नसेल– तर भारतीयांच्या पवित्र स्थानांची विटंबना करणाऱ्या अधमांचा सूड घेणे हे त्याचे कर्तव्यच ठरते.

हे कर्तव्य मराठ्यांना पूर्णपणे पार पाडता आले असे कोणीच म्हणत नाही, त्यामुळे "सर्व पवित्र स्थळे जिद्दीने सोडविली असा इतिहास घडला काय ?" या आठवल्यांच्या प्रश्नाचे उत्तर "नाही" असे आहे. पण यावरून मराठे अपेशी झाले एवढेच सिद्ध होते. भारताचे स्वातंत्र्य हा त्यांच्या साम्राज्यसत्तेमागचा हेतु नव्हता असे त्यावरून कसे सिद्ध होईल ?

### मराठ्यांची युद्धनीति

आठवल्यांच्या पत्रातील मुद्द्यांचा याप्रमाणे परामर्श घेतल्यावर मराठ्यांच्या राजनीतीसंबंधी चार शब्द लिहितो. मराठ्यांना साऱ्या भारतावर आधिपत्य स्थापित करायचे होते. मराठी सत्ता ही केवळ महाराष्ट्रीय सत्ता कधीच नव्हती याबद्दल शतशः पुरावे आहेत. "दिल्लीन्द्रपदलिप्सवः" म्हणून मराठ्यांचा जागोजाग उल्लेख आहे. आपले ध्येय "हिंदवी स्वराज्य" हे आहे हे स्वतः शिवाजी महाराजांनीच एका पत्रात सांगितले आहे. "हिंदुस्थान बळावले" म्हणून आनंद व्यक्त करताना समर्थांनी याच ध्यासाला शब्दरूप दिले आहे. रघुनाथराव व पेशव्यांचा वकील गोविंदराव काळे यांनी "अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्रापावेतो हिन्दूचे स्थान, तुर्कस्थान नव्हे ... काबूल व कंदहार हे अटकेपारचे सुभे हिंदुस्थानकडे" असे उद्गार काढले. पेशव्यांनी याच भारताच्या सीमा मानून राजकारण केले. एवढा महान् उद्योग करायला प्रबळ सैन्याची जरूर होती. अशा सैन्याचा खर्च सोसण्याचे सामर्थ्य शिवाजीच्या वा पेशव्यांच्या ताब्यात असलेल्या मुलखात नव्हते. म्हणून शिवाजीने एक युद्धनीति आखून दिली. ती ही की आपल्या सैन्याचा खर्च शत्रूच्या मुलखातून झाला पाहिजे. म्हणूनच मराठ्यांनी शत्रूच्या व इतरांच्या मुलखावर चौथ व सरदेशमुखी आकारली. ही चौथ व सरदेशमुखी वसूल करतांना जी कारवाई करण्यात येत असे तिला परकीय निंदकांनी लूट असे नाव दिले आहे. मराठ्यांनी रजपुतांवर लादलेली खण्डणी इतकी मोठी होती की ती त्यांना देणेच शक्य नव्हते असा आठवल्यांनी आरोप केला आहे. हा आरोप सिद्ध करण्यास रजपुतांच्या उत्पन्नाचे आकडे, त्यांनी परकीय आक्रमकांना दिलेल्या खंडण्या वगैरे कोणताच पुरावा आठवल्यांनी सादर केला नाही. श्री. ग. ह. खरे यांनी यावर तपशीलवार विवेचन करून मराठ्यांनी आकारलेली खंडणी किती मापक असे व ही मापक खंडणी वसूल करताना देखील








त्यांचा व्यवहार किती सदय असे याचे सप्रमाण विवेचन केले आहे. ( स्वाती ). ते ध्यानात घेण्याची आठवल्यांना आवश्यकता वाटली नाही. चौथ व सरदेशमुखीच्या नीतीमुळे मराठयांच्या शत्रूंचे सामर्थ्य खची झाले, मराठयांचे सामर्थ्य वाढले व त्यांना अखिल भारतीय सत्ता स्थापन करणे शक्यतेच्या कोटीत आणता आले.

मराठयांनी ज्या मुलखावर चौथ व सरदेशमुखी लादली तेही भारताचेच प्रदेश होते तेव्हा त्यांना अखिल भारताचे हितकर्ते कसे म्हणता येईल असे विचारण्यात येते. त्यावर उत्तर असे की नात्सी आक्रमकांना अडवण्यासाठी स्टालिनने आपल्याच पितृभूमीचे प्रदेश बेचिराख केले, बेचाळीस साली भारतातील क्रान्तिकारकानी ब्रिटिश शासन उलथून टाकण्यासाठी आपल्याच देशातील आगगाड्यांचे रूळ उखडले व टपालघरे जाळली. शत्रूशी जीवनमरणाचा संग्राम करायचा असेल तर स्वतःच्या देशाच्या बाबतीत देखील दग्धभूमीचे धोरण स्वीकारावे लागते असे इतिहासात सर्वत्र दिसून आले आहे. You can not make omelettes without breaking eggs. क्रान्ति हा सुखासीन लोकांचा उद्योग नाही.

## मराठयांचा अखिल भारतीय सन्मान

मराठयांच्या कार्याचे स्वरूप स्वातंत्र्यसंग्रामाचे होते हे परकीय निंदकांची पोपटपंची करणाऱ्या आधुनिकांना कळत नसले तरी मराठयांच्या सैनिक हालचालींनी ज्या प्रदेशांना तोशीस पोचली त्याप्रदेशातल्या देखील तत्कालीन भारतीयांना ते पुरेपूर कळत होते. पानिपतच्या युद्धाच्या वेळी वर्षदोन वर्षे मराठी फौजा आसपासच्या प्रदेशात सारख्या वावरत होत्या. याचा तेथील रहिवाशांना मनस्वी त्रास झाला असेल हे अपरिहार्य होते. असे असून या प्रदेशातील लोकात अजूनही मराठयांबद्दल ज्या स्मृति रेंगाळत आहेत त्या पानिपतच्या पराभवाचे सारे दुःख विसरायला इतक्या अभिमानास्पद आहेत. या भागातील लोकांच्या तोण्डी पानिपतचा एक पोवाडा अजूनही घोळतो आहे. ( पानिपत : शेजवलकर ). त्या अनुसार तेथील लोकांच्या लेखी सदाशिवराव भाऊ व त्याच्याबरोबर धारातीर्थी पडलेले वीर हेच पानिपतच्या पर्वातले पूजाविषय होते, अब्दाली प्रभृति आक्रमक नव्हेत. तेथील एका खेड्यातील मुली विवाहासाठी बहिष्कृत समजण्यात येत असत. कारण ' त्या खेड्यातील लोकांनी मराठ्यांशी विश्वासघात केला. ' सूरजमल जाट देखील आधी ससैन्य भाऊसाहेबास मिळाला होता. नंतर तो जरी त्यांना सोडून गेला तरी पानिपतच्या पराभवानंतर त्याने पळणाऱ्या मराठ्यांना आश्रय दिला, अब्दालीची अवकृपा आपल्यावर ओढवेल याची फिकिर केली नाही.

विश्वगुणादर्श हा संस्कृत ग्रंथ मराठेशाहीच्या काळातलाच आहे, त्यात भारतातील निरनिराळया प्रान्तातील लोकांचे गुणदोष वेंकटाध्वरी या अमहाराष्ट्रीय लेखकाने वर्णन करून सांगितलेले आहेत. मराठयांबद्दलचे त्यात आलेले पुढील उल्लेख आठवल्यासारख्या लेखकांनी मनन करण्यासारखे आहेत :

देवक्षोणीसुरहितकृते दारितम्लेच्छपंक्तेः ।  
मह्यां सह्या कथमपि महाराष्ट्रयूथस्य चेष्टा ॥  
व्याधिव्यूहप्रतिहतिकृतां व्यक्तमुग्रौषधानां ।  
कायारोग्यप्रणयिहृदयैः काटवं मर्षणीयम् ॥

मायाचुंचुतया भयावहगतिः प्रत्यर्थिपृथ्वीभुजां ।  
माहाराष्ट्रभटच्छटा रणपटुर्नो पर्यटाट्येत चेत् ।  
देवब्राह्मणवर्गनिग्रहकृतो देशांस्तुरुष्का इमे ।  
निष्प्रत्यूहमनोरथा वितनुयुर्निर्देवभूमीसुरान् ॥

" रणपटु महाराष्ट्रीय योद्धे साऱ्या देशभर संचार करीत आहेत. या संचारामुळे जो त्रास होतो तो सहन करण्यास आपण शिकले पाहिजे, कारण या वीरांच्या पराक्रमाची छत्रछाया नसती तर सारा देश तुर्कमय झाला असता व देवब्राह्मणांचे नाव देखील ऐकू आले नसते."

" देवब्राह्मणांच्या रक्षणाची तळमळ हा भोळेपणा आहे. सारा देश तुर्कमय होऊन भारताचे तुर्कस्थान झाल्याने काही बिघडणार नव्हते " असे यावर आठवले म्हणतील. पण मराठे लुटारू होते की तत्कालीन अखिल भारतीय जनतेला मान्य असलेले काही ध्येय त्यांच्यासमोर होते या प्रस्तुत चर्चेच्या दृष्टीने हा आक्षेप अप्रस्तुत आहे. देवब्राह्मणांचे रक्षण हे तत्कालीन भारतीयांच्या दृष्टीने महनीय ध्येय होते व त्या ध्येयाचे सर्वात मोठे पाइक मराठे होते हे तत्कालीन वाङ्मय वाचणाऱ्या कुणालाही कळण्यासारखे आहे.

## मौर्य व गुप्त यांची परंपरा

मराठे लुटारू नव्हते एवढेच नव्हे तर मौर्य व गुप्त यांच्या परंपरेतले न्यायी व कार्यक्षम राज्यकर्ते होते हे डॉ. सुरेन्द्रनाथ सेन यांनीं आपल्या Maratha Administration या ग्रंथात दाखवून दिले आहे. एडवर्ड थॉमसन लिहितो की इंग्रजांच्या ताब्यात असलेला मद्रास प्रांत तेथील जनतेच्या दृष्टीने यमपुरीसारखा होता. उलट ज्या प्रांतावर नाना फडणीसाची सत्ता चालत होती तेथे सुरक्षिततेचे नंदनवन फुलले होते. मराठ्यांच्या अमलातील भारत हे निर्याती राष्ट्र होते, आयातीपेक्षा निर्यात मोठी असणे हे समृद्ध अर्थव्यवस्थेचे लक्षण समजतात. मराठ्यांच्या राज्यातील व्यापारी मस्कत व चीनपर्यंत फेऱ्या मारीत. मराठ्यांना बाहेरच्या जगाचे ज्ञान नव्हते हा प्रवाद निराधार आहे हे यावरून सिद्ध होते. पृथ्वीपर्यटनात ते इंग्रजांच्या तोडीचे नव्हते एवढाच या आरोपातला सत्यांश समजायचा. व्यापाराप्रमाणेच शेतीसुधारणा व पडीत जमिनी लागवडीखाली आणण्याचे प्रयत्न झाले. सुरजी अंजनगावच्या परिसरातील जमीन लागवडीखाली कशी आणली गेली याचे उल्लेख कागदपत्रात आढळतात. मराठेशाहीतील वैद्य विधायक शस्त्रक्रिया जाणत. पुण्यात झालेली अशी एक शस्त्रक्रिया पाहून एका युरोपीय चिकित्सकाने विधायक शस्त्रक्रिया युरोपात नेली. (Gentleman's Magazine, London 1794). मराठे अग्निबाणांचा वापर करीत. या अग्निबाणांनी इंग्रजी सैन्यात बराच प्रलय माजविला होता असे इंग्रजी लेखकांनी लिहून ठेवले आहे. अग्निबाणांची विद्या इंग्रजांच्या अनुकरणाने आलेली नव्हती यावरून वैज्ञानिक युद्धकलेत कल्पकता प्रकट करण्याची कुवत मराठ्यात होती हे स्पष्ट आहे. मराठेशाहीच्या काळातील भारत, विज्ञानाच्या व तंत्रविद्येच्या बाबतीत इंग्रजांच्या पुष्कळच मागे असला तरी आजच्याप्रमाणे सर्वस्वी परावलम्बी नव्हता. १८२१ साली इंग्रजांच्या राज्यात साक्षरतेचे जे प्रमाण होते त्यापेक्षा पेशव्यांच्या राज्यात अधिक होते हे ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या प्रतिवृत्तावरूनच सिद्ध करता येण्यासारखे आहे. या महत्त्वाच्या तथ्याकडे महात्मा गांधींनीच शिक्षातज्ज्ञांचे लक्ष वेधले होते. मराठ्यांचे आरमार बलाढ्य होते. या आरमारासाठी लागणारी जहाजे भारतातच बनविलेली असत. भारतनिर्मित जहाजांचा दर्जा तत्कालीन पुढारलेल्या राष्ट्रात होणाऱ्या जहाजांच्या तोडीचा असे. भारतातील जहाजे युरोपात देखील निर्यात होत. सारांश मराठेशाहीतील भारत हा आजच्या भारताप्रमाणे एक मागासलेला– नव्हे विकासोन्मुख–देश समजला जात नव्हता.

ब्रिटिशांनी भारतात प्रथमच शास्त्रीय न्यायदानाची पद्धति सुरू केली असे नेहमी म्हणण्यात येते. हा देखील आधुनिकांच्या अंधश्रद्धेचा एक मासला आहे. डॉ. सेनांनी मराठेशाहीतील न्यायदानाचे सविस्तर वर्णन केले आहे. मराठेशाहीत न्याय मिळणे ब्रिटिश पद्धतीपेक्षा अधिक सुकर असे असाच त्यावरून निष्कर्ष निघतो. ब्रिटिश पद्धतीत न्यायापेक्षा शब्दांचा कीस, वकीलांच्या व न्यायालयांच्या लठ्ठ दक्षिणा यांचाच भाग अधिक आहे. वकीलांच्या कौशल्यावर निर्णय अवलंबून असणे हे शास्त्रीय न्यायपद्धतीचे लक्षण खास नाही. वकिलींच्या कौशल्यावर निर्णय अवलंबून नसेल तर वकीलांना देण्यात येणाऱ्या लठ्ठ दक्षिणा अकारण दिल्या जातात असे म्हटले पाहिजे.

मराठेशाहीत चोर व चोरीचा माल सापडवून तो मूळ मालकाला परत करण्याची जबाबदारी सरकारची असे. चोरीचा माल परत करता आला नाही तर स्वतः सरकारला लुबाडल्या गेलेल्या माणसाच्या नुकसानीची भरपाई करून द्यावी लागत असे. चोराने लुटलेल्या मालाबद्दल देखील जे राज्यकर्ते नुकसानभरपाई देत असत ते आपल्याच प्रजेची लूट करीत असा आरोप आठवल्यांसारख्यांनी करावा यापरता दैवदुर्विलास तो कोणता ?

ले. कार्लजी युंग : अनु. बा. रं. सुंठणकर

# महान मूर्तिभंजक फ्रॉयड

मनोविश्लेषणशास्त्राचा संस्थापक नुकताच निवर्तला आहे. गेल्या अर्धशतकाचा सांस्कृतिक इतिहास अतूटपणे सिग्मुंड फ्रॉयड याच्या नावाशी सांधला गेला आहे. प्रयोगसिद्ध विज्ञाने वगळल्यास फ्रॉयडच्या दृष्टिकोणाचा परिणाम आजच्या प्रचलित विचारणाच्या जवळ जवळ प्रत्येक क्षेत्रावर झाला आहे. त्याचा ठसा सर्वाधिक मनोविकृतिविज्ञानावर आणि त्यामागून मानसशास्त्र, तत्त्वज्ञान, सौंदर्यशास्त्र, मानववंशशास्त्र आणि- अखेरचे पण कमी महत्वाचे, नव्हे- धर्माचे मानसशास्त्र यावर उमटला आहे. मनाच्या स्वरूपासंबंधी मानव आज जे काही सांगू शकतो, मग ते सत्य असो वा सत्याभास असो, त्याचा संबंध मानवासंबंधीच्या विज्ञानाच्या मुळाशी अवश्यतया पोचतो. आणि जरी खरोखरीचे निर्णायक शोध वैद्यकाच्या क्षेत्रात लागले असले, तरी त्यांची गणना " मानव्य " या शाखेत करता येत नाही.

फ्रॉयड हा खऱ्या अर्थाने आणि प्रामुख्याने " नस विशेषज्ञ " ( nerve specialist ) होता आणि प्रत्येक बाबतीत तो शेवटपर्यंत तसाच राहिला. शैक्षणिक दृष्ट्या तो मानसचिकित्सक किंवा मानसशास्त्रज्ञ किंवा तत्त्वज्ञही नव्हता. तत्वज्ञानात तर अगदी प्राथमिक तत्वांच्या अध्ययनाचा त्याच्यापाशी अभाव होता. नित्शे वाचावा असे आपल्या मनात कधीही आले नाही, असे त्याने मला एकदा निश्चितपणे सांगितले होते. ही गोष्ट फ्रॉयडची विशिष्ट मते समजून घेण्यासाठी महत्वाची आहे. त्याच्या मतामध्ये कोणत्याही तत्वज्ञानात्मक पूर्वपक्षाचा उघडच पूर्ण अभाव ठळकपणे दिसून येतो. त्याच्या सिद्धांतावर डॉक्टरांच्या चिकित्सालयाची अचूक छाप पडली आहे. त्याच्या कार्याचा प्रयाणबिंदू सातत्याने विकृतीची बाधा झालेले मन हा होता; आणि त्या मनाची रहस्ये तो उलगडत असे. त्यात डॉक्टरांच्या सूक्ष्म तपासणीत आढळून येणाऱ्या अनिच्छा आणि न लपणारा आनंद यांचे मिश्रण असे. परंतु मनोविकृत रोगी हा आपल्या व्यक्तिगत आजाराशिवाय स्थलकालिक मनोवृत्तीचाही दर्शक असतो. त्यामुळे आरंभापासूनच विशिष्ट प्रकाराविषयीची डॉक्टराची मते आणि काही सामान्य गृहीतके यांच्यामध्ये एक प्रकारचा सेतू तयार होत असतो. अशा सेतूच्या अस्तित्वाच्या योगाने फ्रॉयडला आपली अंतः-प्रवृत्ति चिकित्सालयाच्या संकुचित क्षेत्राकडून नैतिक, धार्मिक, तत्वज्ञानात्मक विचारांच्या विशाल जगाकडे वळविता येणे शक्य झाले; आणि दुर्दैवाने हे विचारही त्याच्या सूक्ष्म तपासणीशी जुळणारे होते.

फ्रॉयडला मूळ चालना मिळाली ती सालपे-येर येथील त्याचा थोर शिक्षक शार्को याच्यापासून. तेथे जो पहिला मूलभूत धडा शिकला, तो संमोहन विद्या आणि सूचन यांच्यासंबंधी होता. १८८८ मध्ये त्याने बर्नहायमच्या सूचनावरील पुस्तकाचे भाषांतर केले. शार्कोपासून त्याला मिळालेला दुसरा धडा म्हणजे उन्मादावस्थेची लक्षणे ही " मेंदू "ला पछाडणाऱ्या विशिष्ट कल्पनांचे परिणाम असतात हा त्याचा शोध होय. शार्कोचा दुसरा शिष्य प्येर इयाने याने आपल्या विस्तृत पुस्तकात हा सिद्धांत विशद करून त्याला आवश्यक तो पाया तयार करून दिला. व्हिएन्ना येथील फ्रॉयडचा जुना सहाध्यायी योसेफ ब्रॉयेर याने या अत्यंत महत्वाच्या शोधाच्या पुष्ट्यर्थ एका रोग्याचे सोदाहरण प्रकरण मिळवून दिले. ( हा शोध कित्येक घरच्या डॉक्टरानी प्रसंगवशात यापूर्वी केलाही होता. ) त्यावर त्याने जो सिद्धांत बसविला त्यासंबंधी फ्रॉयड एकदा म्हणाला होता की, " पुरोहिती कल्पनाजालाच्या ' राक्षसा 'च्या जागी आम्ही एखादे मानसशास्त्रीय सूत्र स्थापन केले म्हणजे ही गोष्ट मध्ययुगीन दृष्टीशी जुळणारी होते. " पछाडण्याच्या क्रियेची मध्ययुगीन उपपत्ति (इयानेने, त्याला ' गंड ' हे नाव दिले होते) ब्रॉयेर आणि फ्रॉयड यानी अशाप्रकारे अधिक निश्चित स्वरूपात उचलली. त्या उपपत्तीतील दुरात्म्याचे










अनुक्रमणिका

फाऊस्टचा चमत्कार उलटा करून– निरुपद्रवी " मानसशास्त्रीय सूत्रा "त रूपांतर करण्यात आले. या दोघा संशोधकांचे मोठे श्रेय हे की, त्यांनी बुद्धिवादी ज्याने प्रमाणे पछाडण्याच्या क्रियेचे अर्थपूर्ण सादृश्य शब्दावडंबराने झाकून टाकले नाही; तर उलट मध्ययुगीन उपपत्तीचे अनुकरण करून जणू काही दुरात्म्याला गाडून टाकण्याकरिता पछाडण्याच्या क्रियेला कारणीभूत होणाऱ्या घटकांचा पिच्छा पुरविला. रोगजनक "भावना" या विशिष्ट घटनांच्या स्मृति असतात हा शोध लावणारा ब्रॉयेर हा पहिला होता. या भावनांना त्याने आधिकर ( traumatic ) असे म्हटले आहे. या शोधामुळे साल्पे-येर येथे सुरू झालेले कार्य पुढे चालू झाले आणि त्यामुळे फ्रॉयडच्या साऱ्या सिद्धांतांचा पाया बांधला गेला. १८९३ मध्येच या दोघाही पुरुषांनी आपल्या शोधांचे दूरगामी व्यावहारिक महत्त्व ओळखले होते. लक्षणजनक भावनांचे मूळ विकारात ( affect ) असते याची जाणीव त्यांना झाली. या विकाराचा विशेष हा की कधीही पृष्ठभागावर येत नाही; म्हणजे त्याची जाणीव खरोखरीच कधी होत नसते. म्हणून हा कोंडलेला विकार बाहेर आणणे हे रोगचिकित्सकाचे कार्य असते.

हे तात्पुरते सूत्र खचित सोपे होते– इतके की त्यांवरून सामान्यतः मनोविकृतीच्या रहस्याचा उलगडा होऊ शकत नव्हता. येथूनच फ्रॉयडने आपल्या स्वतंत्र संशोधनाला आरंभ केला. सर्वप्रथम त्याचे लक्ष वेधले, ते आधीच्या (trauma) प्रश्नामध्ये. त्याला लवकरच आढळून आले (किंवा तसे आढळल्याचे त्याला भासले) की, आधिकर घटक दुःखदायक असल्यामुळे अबोध असतात. पण ते त्यावेळच्या त्याच्या मताप्रमाणे दुःखदायक असतात, याचे कारण ते एकजात लैंगिक क्षेत्राशी संबंधित असतात. लैंगिक आघीचा सिद्धांत हा फ्रॉयडचा उन्मादावस्थेविषयीचा (Hysteria) पहिला सिद्धांत होय. ज्या कोणा विशेषज्ञाचा मनोविकृतीशी संबंध येतो, तो एका बाजूने रोगी किती सूचक असतो हे जसे जाणतो, तसेच दुसऱ्या बाजूने त्याचे वृत्तांतकथन किती अविश्वासार्ह असते हेही चांगले ओळखतो. म्हणून या सिद्धांताच्या पायाखालची जमीन निसरडी आणि घातक होती. म्हणून फ्रॉयडला कमी अधिक मुकाट्याने त्यात दुरुस्ती करणे भाग पडले. ही दुरुस्ती त्याने बाल्यावस्थेतील भ्रामक कल्पनांच्या असाधारण वाढीच्या आधिकर घटकावर आरोपण करून केली. या अतिरिक्त भ्रामक कल्पनेच्या क्रियेची प्रेरक शक्ती बाल्यावस्थेतील लैंगिकता असते असे त्याने गृहीत धरले. पूर्वी अशी गोष्ट उघड बोलणे लोकांना मुळीच आवडले नसते. वैद्यकीय वाङ्मयात असाधारण अकालपरिपक्वतेची वाढ झाल्याची उदाहरणे स्वाभाविकतःच फार पूर्वीपासून ज्ञात होती. पण सापेक्षतः निर्दोष बालकात अशी उदाहरणे सापडतात असे कोणी गृहीत धरले नव्हते. फ्रॉयडनेही ती चूक केली नाही; किंवा अकालपक्व वाढीचे कोणतेही प्रत्यक्ष रूपही त्याने मनात आणले नव्हते. हा प्रश्न काहीसा बाल्यावस्थेत घडणाऱ्या प्रकारांचा लैंगिकतेच्या परिभाषेत अन्वयार्थ लावण्याचा किंवा भाष्य सांगण्याचा होता. प्रत्येक नव्या मूलग्राहि विचाराला न चुकता तज्ज्ञ मंडळीकडून जबरदस्त प्रतिकार सहन करावा लागतो ही गोष्ट एकवेळ बाजूला सारली, तरी बालकाच्या सहजप्रवृत्तीच्या जीवनाचे फ्रायडने केलेले हे संकल्पन नेहमीच्या आणि सर्वसाधारण मानसशास्त्राच्या प्रांतावर एक आक्रमणच होते. कारण त्याची निरीक्षणे मनोविकृतीच्या मानसशास्त्राचा प्रांत सोडून ज्या प्रदेशात शिरली होती, तो पूर्वी कधीही अशा प्रकारे उजेडात आला नव्हता.

मनोविकृत माणसांच्या आणि विशेषतः उन्मादावस्थेतील मनःस्थितीच्या काळजीपूर्वक आणि परिश्रमाने केलेल्या संशोधनामुळे फ्रॉयडला एक गोष्ट उघडपणे समजून आली की, असे रोगी नेहमी असाधारणपणे जागते स्वप्न-जीवन प्रकट करतात आणि त्यामुळे स्वतःच्या स्वप्नासंबंधी बोलणे त्यांना आवडते. त्यांच्या स्वप्नांची अभिव्यक्ती रचनेत आणि प्रकारात नेहमी त्यांच्या मनोविकृतीच्या लक्षणविज्ञानाशी जुळणारी असते. चिंतेची अवस्था आणि चिंताविषयक स्वप्ने ही एकत्र वावरतात आणि एकाच मूलस्थानात उगम पावतात. म्हणून फ्रॉयडला आपल्या संशोधनाच्या व्याप्तीतून स्वप्नांच्या समावेश टाळणे शक्य झाले नाही. आधिकर विकार जे 'बंदिस्त' रहातात ते 'विसंवादी' सामग्रीचे दमन होते त्यामुळे होय, हे त्याने फार पूर्वीच ओळखले होते. बाहेर दिसणारी लक्षणे ही प्रेरणा, कामना आणि भ्रामक







कल्पना यांच्या जागी येणाऱ्या गोष्टी असतात. ही सर्व नैतिक आणि सौंदर्यदृष्ट्या क्लेशकारक असतात; त्यामुळे नैतिक रूढींनी लादलेल्या दोषान्वेषणातून ( censorship ) ती तपासली जातात. दुसऱ्या शब्दात एका विशिष्ट प्रकारच्या नैतिक प्रवृत्तीच्या योगाने ती सबोध मनाच्या बाहेर फेकली जातात आणि विशिष्ट अवरोधनाच्या ( inhibition ) क्रियेमुळे त्यांचे स्मरण रहाण्याला प्रतिबंध होत असतो. फ्रॉयडने यथार्थतेने म्हटल्याप्रमाणे 'दमनाची उपपत्ति' त्याच्या मानसशास्त्राचा मध्यबिंदु होती. त्याच्या या उपपत्तीमुळे कित्येक गोष्टींचे स्पष्टीकरण होते. त्यामुळे ती स्वप्नांच्या बाबतीत लागू करण्यात आली तर त्यात आश्चर्य मानण्याचे कारण नाही. फ्रॉयडचा 'स्वप्नमीमांसा' हा ग्रंथ ( १९०० ) युगप्रवर्तक आहे. संभवतः अनुभववादाच्या सकृद्दर्शनी पक्क्या भूमीवरून अबोध मनाच्या रहस्यावर विजय मिळविण्यासाठी आतापर्यंत झालेल्या सर्व प्रयत्नात हा सर्वात धाडसी प्रयत्न आहे. रोग्यांच्या उदाहरणांच्या साहाय्याने फ्रॉयडने स्वप्ने ही प्रच्छन्न इच्छापूर्ती असतात हे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. 'दमनयंत्रणा' ही मनोविकृतीच्या मानसशास्त्रापासून उसनवट घेतलेली संकल्पना असून स्वप्न-घटनापर्यंत तिचा करण्यात आलेला विस्तार हे नित्याच्या मानसशास्त्राच्या क्षेत्रावर झालेले दुसरे अतिक्रमण होते. त्याचे परिणाम अपरिमित झाले. कारण त्यामुळे प्रश्नांचे जे मोहोळ उठले, ते शमविण्याकरिता चिकित्सालयातील मर्यादित अनुभवापेक्षा अधिक व्यापक साधनसामग्रीची गरज होती.

स्वप्नमीमांसेवरील फ्रॉयडचा ग्रंथ हा संभवतः सर्वात अतिशय महत्वाचा आहे. त्याबरोबरच त्यावर सर्वात अधिक टीकाही झाली आहे. आम्हा तरुण मानस-चिकित्सकाना त्यावेळी तो प्रकाशाचा झराच वाटत होता. पण आमच्या जुन्या सहाध्यायांच्या तो चेष्टेचा विषय झाला होता. मनोविकृति ही मध्ययुगीन "पछाडण्याच्या क्रिये"चे एक स्वरूप असते अशी मान्यता जशी त्याने दिली, तसेच स्वप्ने ही अबोध प्रक्रियेसंबंधीच्या ज्ञानाची अतिशय महत्वाची उगमस्थाने असतात– स्वप्न हा अबोधाचा राजमार्ग आहे- असे प्रतिपादन करून त्याने भूतकालातून जे असाध्यपणे विस्मृतीत गडप झाले असे वाटत होते ते काहीतरी अत्यंत मूल्यवान असते हे दाखवून ते जतन करून ठेवले. खरोखरीच प्राचीन वैद्यकात तसेच जुन्या धर्मांतही स्वप्नाना दांडगी अर्थवत्ता आणि द्रष्टेपणाची प्रतिष्ठा लाभली होती. तथापि चालू शतकाच्या आरंभी स्वप्नासारख्या अप्रिय अशा गोष्टीला गंभीर चर्चेचा विषय बनविणे हे सर्वात मोठ्या वैज्ञानिक धाडसाचे कृत्य होते. आम्हा तरुण मानसचिकित्सकावर जर कशाची सर्वात अधिक छाप पडली असेल, तर ती तंत्राची किंवा सिद्धांतांची नव्हे– ही दोन्ही आम्हाला फार वादग्रस्त वाटत– तर कोणी एकाने स्वप्नांचे संशोधन करण्याचे धाडस दाखवावे याच गोष्टीची होय. संशोधनाच्या या दिशेच्या योगाने मनोविभ्रमाचे आभास आणि अंतर्गत भ्रांति ही समजण्याचा मार्ग खुला झाला. तोवेळपावेतो मानसचिकित्सक त्यांचे वर्णन केवळ बाह्यांगानी करू शकत होते. यापेक्षाही अधिक म्हणजे स्वप्नमीमांसेने मनोविकृत तसेच निकोप माणसांच्या मानसशास्त्रातील आतापर्यंत बंदिस्त असलेल्या कित्येक दालनांच्या चाव्या खोलून दिल्या.

दमनाची उपपत्ति पुढे थट्टाविनोदाच्या मीमांसेकरितां उपयोजिण्यात आली. १९०५ मध्ये फ्रॉयडने "थट्टामस्करी आणि त्यांचा अबोधाशी संबंध" हा विषय घेऊन एक मनोरंजक पुस्तक प्रसिद्ध केले. हे पुस्तक म्हणजे "दैनंदिन जीवनातील मनोविकृति विज्ञान" या त्याच्या पुस्तकाचा लॅबकच होय. Totem and Taboo या पुस्तकात दमनाच्या पलीकडे जाऊन प्राथमिक अवस्थेतील मानसशास्त्राच्या प्रांतात त्याने मारलेली भरारी कमी यशस्वी ठरली. कारण मनोविकृतांच्या मानसशास्त्रातून निष्पन्न झालेली संकल्पने प्राथमिक मानवी मनांच्या बाबतीत लागू केल्याने त्या मनांचे स्पष्टीकरण झाले नाही, तर त्यामुळे त्या संकल्पनांचा अपुरेपणा मात्र स्पष्टपणे उघडा झाला.

फ्रॉयडने आपल्या उपपत्तीचे अखेरचे उपयोजन Future of an Illusion या पुस्तकांत धर्माच्या क्षेत्रात केले. ( १९२७ ) Totem and Taboo मधील हे उपयोजन बरेचसे समर्थनीय म्हणता आले. तरी या पुस्तकाबद्दल दुर्दैवाने तसे म्हणता येत नाही. तत्वज्ञानाच्या आणि धर्मेतिहासाच्या क्षेत्रात त्याची तयारी अपुरी होती हे दुःखद रीतीने या पुस्तकात ठळकपणे







दिसून येते. धर्म ही काय चीज आहे याचे आकलन त्याला झाले नव्हते ही गोष्ट तर बाजूलाच राहो. पण आपल्या उतार वयात त्याने मोझेसवर एक पुस्तक लिहिले. त्यात मोझेसने इस्राएलच्या पुत्रांना "आश्वासित भूमी'कडे नेले; परंतु स्वतः मोझेसला त्याभूमीत पाऊल ठेवू दिले नाही. फ्रॉयडसारख्या व्यक्तीने मोझेसची निवड करावी हा बहुधा अपघात नव्हे.

मी आरंभी म्हटल्याप्रमाणे फ्रॉयड हा नेहमी भिषग्वर म्हणून राहिला. अन्य क्षेत्रात त्याचे लक्ष गुंतले असले, तरी त्याच्या मनःचक्षूसमोर सतत मनोविकृतांच्या शुश्रूषेचे चित्र उभे रहात असे– ही प्रवृत्तीच मुळी लोकाना आजारी बनविते आणि त्याना बरे होऊ देत नाही. ज्या कोणासमोर असे चित्र उभे असते, त्याला प्रत्येक गोष्टीत दोषच दिसतात आणि जे भयानकपणे बाधक असते ते दिसू नये म्हणून त्याविरुद्ध त्याने कितीही धडपड केली तरी ते पहाणे त्याला भाग पडते आणि ते त्याला नेहमीच पहावे लागते : मर्मस्थळे, मना झालेल्या इच्छा, सुप्त संताप, गुह्य गोष्टी, 'दोषान्वेषका'ने विकृत केलेली विपर्यस्त इच्छापूर्ति. मनोविकृत माणूस आजारी असतो, त्याचे नेमके कारण म्हणजे अशा प्रकारच्या गोष्टी त्याच्या मनाचा पूर्ण ताबा घेतात. कारण जरी त्याच्या अबोधात इतर कित्येक गोष्टींचा भरणा असला, तरी त्यात त्याच्या जाणीवेने सकारण नाकारलेल्या 'आशयांची नुसती गर्दी झाल्याचे आढळून येते. म्हणून फ्रॉयडच्या विचारांचे मुख्य सूत्र भयानकपणे निराशावादी "नान्यथा किमपि" हेच आहे. तो अबोधावस्थेत रोग्याचा थोडातरी फायदा करणाऱ्या उपकारक आणि रोगनिवारक शक्तींचे दर्शन घडविण्याचा मार्ग कोठेही खुला करीत नाही. प्रत्येक भूमिका मानसशास्त्रीय चिकित्सेने उखडली जाते. या चिकित्सेमुळे प्रत्येक गोष्ट प्रतिकूल किंवा संदिग्ध घटक बनते किंवा निदान तसे घटक अस्तित्वात असल्याचा संशय निर्माण करते. ही अभावात्मक प्रकृति विपुल प्रमाणात निर्माण होणाऱ्या भिषक्क्रियेच्या लहानसहान लीलाना लागू केली म्हणजे निःसंशय योग्य ठरते. अशा बाबतीत पार्श्वभागी असलेल्या अप्रिय गोष्टीविषयी तर्क बांधणे बहुधा मुद्याला धरून असते– पण नेहमीच नव्हे. तसेच असा कोणताही आजार नसतो की त्याच वेळी तो रोग बरा करण्याचा अयशस्वी प्रयत्न नसतो. रोगी हा नैतिक दृष्ट्या मना असलेल्या कामनांचा गुप्त साथीदार असतो, असे त्याचे स्वरूप दाखविण्याऐवजी सहजप्रवृत्तींचे जे प्रश्न त्याला समजत नाहीत आणि प्राप्त परिस्थितीत जे सोडविण्याच्या कामी त्याच्या साहाय्याला कोणी येत नाही, अशा प्रश्नांचा तो अजाण बळी असतो असे त्याचे स्पष्टीकरण करता येणे शक्य असते. विशेषतः त्याची स्वप्ने निसर्गाचेच शुभशकुन म्हणून समजता येणे शक्य आहे. आणि स्वप्न-क्रियेत फ्रॉयड सर्वस्वी मानवी, आत्मवंचना करणारे जे व्यापार हुसडतो त्यांच्याशी या शुभशकुनांचा काहीही संबंध नसतो.

मी जे हे सांगत आहे, ते फ्रॉयडच्या सिद्धांतावर टीका करण्याच्या हेतूने नव्हे, तर १९ व्या शतकाच्या सर्व किंवा बहुतेक सर्व आदर्शाविषयीच्या त्याच्या संशयवादावर भर देण्याकरिता होय. फ्रॉयडकडे पहाताना या पार्श्वभूमीवरून पाहिले पाहिजे. त्याने नेमके अनेक व्याधींवर बोट ठेवले. १९व्या शतकात धर्मासकट जे जे चकाकत होते, ते सोने नव्हतेच. फ्रॉयड हा महान विध्वंसक होता. पण १९वे शतक उलटून जाण्याची वेळच अशी होती की, मूर्तिभंजनाच्या इतक्या संधि चालून आल्या की, नित्शेसुद्धा त्याला अपुराच पडला. ते कार्य फ्रॉयडने पुरे केले आणि तेही खरोखरीच पूर्णाशाने. त्याने लोकांच्या मनात एक पथ्यकर अश्रद्धा निर्माण केली आणि तेणेकरून मूल्यांच्या त्यांच्या जाणिवेला धार आणली. मानवाच्या उथळ चांगुलपणाच्या वहात्या पुरात मूळ पापाच्या पोथीतत्त्वाला चिकटून रहाणारे अनेक लोक मूढमति बनले होते. त्याना तो चांगुलपणा समजतही नव्हता. फ्रॉयडने तो सर्व वाऱ्यावर उधळून टाकला. आशा करूया की, त्यातून जो काही उरला सुरला मागे राहिला असेल त्याचीही हकालपट्टी होईल आणि तीही २०व्या शतकाच्या असंस्कृततेच्या हातून. फ्रॉयड हा काही द्रष्टा नव्हता. पण तो भविष्यदर्शी पुरुष होता. नित्शेप्रमाणेच त्याने आमच्या काळच्या प्रचंडमूर्ति फेकून दिल्या. आता आमची सर्वोच्च मूल्ये, त्याची चकाकी नरकातल्या पुराने नाहीशी होण्याइतकी अस्सल आहेत काय हे पहावयाचे आहे. आमची संस्कृति आणि तिची मूल्ये यांच्याविषयी संशय घेणे ही आजची मनोविकृति आहे. आमच्या निष्ठा जर खरोखरीच पक्क्या असत्या,








तर या मूल्याविषयी कोणीही शंका घेतली नसती. अथवा आमची ध्येये म्हणजे आम्ही लपवू इच्छितो अशा हेतूंचे केवळ प्रच्छन्न आविष्कार असतात. असा सत्याभास कोणीही निर्माण करू शकला नसता. पण १९ व्या शतकाने अशा संशयास्पद प्रमेयांचा वारसा मागे ठेवला आहे की, संशय घेणे हे नुसते शक्यच आहे असे नव्हे, तर सर्वथा समर्थनीय व खचित श्रेयस्कर ठरते. सोन्याची किंमत भट्टीत घातल्याशिवाय समजत नाही. फ्रॉयडची तुलना नेहमी किडलेला भाग त्रासदायक-रीतीने कोरून काढणाऱ्या दंतवैद्याशी करण्यात येते. ही तुलना येथपर्यंतच योग्य आहे. पण कोरलेल्या भागात सोने भरण्याची वेळ येते, तेव्हा ती अयोग्य ठरते. फ्रॉयडकृत मानसशास्त्र पोकळी भरून काढीत नाही. काही विशिष्ट बाबतीत आम्ही बुद्धिविरोधी आणि बालिश आहोत किंवा सर्वच धर्म भ्रामक आहेत असे जर आमची चिकित्सक बुद्धि आम्हाला सांगू लागली, तर आमच्या बुद्धिविरोधीपणाला काय करावे ? आणि उध्वस्त झालेल्या भ्रमांच्या जागी दुसरे काय आणावे ? आमच्या भाबड्या बालिशपणात सर्जनशीलतेची बीजे असतात आणि आभास होणे हा जीवनाचा नैसर्गिक भाग आहे. यापैकी एकही दडपून टाकता येणे शक्य नाही; किंवा बुद्धिप्रामाण्याने आणि रूढीच्या व्यवहारीपणानेही ते बदलता येणार नाही.

फ्रॉयडचे मानसशास्त्र १९ व्या शतकाच्या वैज्ञानिक जडवादाच्या संकुचित मर्यादेत घोटाळत रहाते. या गुरुवर्यांच्या अपुऱ्या तत्वज्ञानात्मक सामग्रीमुळे त्याच्या तत्वज्ञानविषयक आधारविधानांची तपासणी त्याने कधी केली नाही. त्यामुळे स्थानीय आणि तात्कालिक पूर्वग्रहांचा प्रभाव त्यावर पडणे अटळ होते-कित्येक टीकाकारांनी ही गोष्ट नमूदही केली आहे. फ्रॉयडची मानसशास्त्रीय पद्धति ही मुख्यतः मनोविकृत रोग्यामध्ये आढळून येणाऱ्या व्याधिग्रस्त आणि निकृष्टदशेला पोचलेल्या भागावर डाग देण्याच्या साधनासारखी आहे आणि सदैव तशीच होती. डॉक्टर लोकांनी वापरावयाचे ते एक साधन आहे. पण ते जेव्हा जीवन आणि त्याच्या गरजा यांच्या नैसर्गिक आविष्काराच्या कामी उपयोजिण्यात येते, तेव्हा ते धोकादायक आणि विध्वंसक किंवा सर्वाधिक म्हणजे निष्परिणामी ठरते. त्याच्या सिद्धांतातील विशिष्ट कट्टर एकांगीपणा आणि बहुधा त्याला पुष्टी देणारी कडवी असहिष्णुता ही कदाचित चालू शतकाच्या पहिल्या दशकात अटळ अशी गरज असतीलही ! पण पुढे या नव्या कल्पना जेव्हा पुष्कळशा मान्य झाल्या, तेव्हा त्यातील सौंदर्यशास्त्रीय दोष प्रत्ययाला येऊ लागला; आणि शेवटी प्रत्येक माथेफिरूपणाच्या वाट्याला येणारी गोष्ट म्हणजे त्याच्या अंतर्गत निश्चितपणाविषयी संशय उत्पन्न होणे, ती त्याच्याही वाट्याला आली. शेवटी आमच्यापैकी प्रत्येकजण ज्ञानाची ज्योत जी वाहून नेतो ती अर्ध्या वाटेपर्यंतच होय. चूक करण्यापासून कोणीही मुक्त नसतो. संशय हीच वैज्ञानिक सत्याची जननी होय. उच्च स्थानावरील पोथीतत्वाशी जो झगडतो, तो दुर्दैवाने अर्ध -सत्याच्या जुलुमाला बळी पडतो. या महापुरुषाच्या भवितव्यात जे जे सहभागी झाले, त्यांना त्याच्या जीवनात ही शोकांतिका क्रमशः आणि वाढत्या प्रमाणात त्याचे क्षितिज आकुंचित करताना दिसून येत होती.

फ्रॉयडच्या वैयक्तिक स्नेहाच्या बंधनात मी कित्येक वर्षे बांधला गेलो होतो. त्यावेळी या विलक्षण पुरुषाच्या मनाचे खोल दर्शन घेण्याची संधि मला लाभली होती. हा पुरुष एका आसुरी शक्तीने झपाटलेला होता– असा पुरुष की, ज्याच्यावर एका दुर्दम्य साक्षात्काराची कृपा झाली आहे आणि त्या साक्षात्काराने घेतलेली त्याच्या आत्म्याची पकड कधीही ढिली झाली नाही. शार्कोच्या कल्पनाशी जेव्हा त्याची गाठ पडली, तेव्हा आसुरी पकडीत सापडलेल्या या आत्म्याची मूळ प्रतिमा जागी झाली आणि त्याच्यात जी ज्ञानलालसा चेतविली गेली तिने त्याच्या दृष्टिसमोर एक काळाकुट्ट खंडच्या खंड उभा केला. झपाटलेल्या मनाच्या खोल अंधाऱ्या दरीची वाट आपल्याला सापडली असे त्याला वाटत होते. भूतकाळात “ मूर्ख भोळी समजूत ” ज्याला पिशाच्चाचा बागुलबोवा म्हणून समजत होती, तिच्या भ्रमाचा पडदा त्याला फाडावयाचा होता. पिशाचाने धारण केलेला छद्मी वेष झोडपून काढून त्याला त्याचे निरुपद्रवी कुलंगी कुत्र्यात रूपांतर करावयाचे होते– थोडक्यात त्याला एक “ मानसशास्त्रीय सूत्र” बनवावयाचे होते. बुद्धीच्या सामर्थ्यावर त्याचा विश्वास होता. फाऊस्टच्या नमुन्याच्या कोणत्याही भीतीने त्याच्या कार्यातील धाडसीला आवर घातला नाही. फ्रॉयड मला एकदा म्हणाला की, “ मनोविकृतांच्या








प्रतीकावरचे मुखवटे एकदा काढून टाकले, म्हणजे भावी कालात ते काय करतील याची मला कल्पना करवत नाही. त्यावेळी मनोविकृतीची बाधाही अशक्य होईल." प्रबोधनाच्या योगाने सर्व काही घडून येईल अशी त्याची अपेक्षा होती. "कलंक सारे धुऊन टाका" हे वोल्तेरचे वचन त्याचे फार आवडते होते. या त्याच्या भावनेतून त्याचे आश्चर्यकारक ज्ञान आणि विकृत मानसिक सामग्रीचे त्याचे आकलन ही जन्माला आली. अशा सामग्रीचा सुगावा त्याला हजार मिषातून सुद्धा लागत असे आणि खऱ्या असीम धीमेपणाने तो ती उजेडात आणू शकत असे.

"भूत हे आत्म्याचे प्रतिस्पर्धी असते" हे लुड्विग क्लॅग याचे वचन फ्रॉयड ज्या पद्धतीने झपाटलेल्या मनाजवळ जात असे तिचे सावध घोषवाक्य म्हणून लागू पडेल. जेव्हा जेव्हा शक्य होत असे तेव्हा तेव्हा तो झपाटणारे आणि दमन करणारे माध्यम म्हणून भूतबाधेला "मानसशास्त्रीय सूत्रा"त बसवून पदच्युत करीत असे. त्याच्या लेखी भूतबाधा म्हणजे नुसते 'नान्यथा किमपि' होती. त्याच्याशी झालेल्या एका निर्वाणीच्या संभाषणात मी त्याला "भूत देवाचे आहे काय तपासून पहा" या वचनाचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. नियतीला आपल्या मार्गाने जाणे भाग असते. एखाद्याला आपण का झपाटलो आहो हे योग्यवेळी समजले नाही, तर तो त्या झपाटण्याला बळी पडू शकतो. अशा माणसाने निदान एकदा तरी स्वतःला विचारावे: "ही भावना मला का झपाटते? माझ्या संबंधात तिचा अर्थ काय?" अशा सारखी अगदी साधी शंका उपस्थित करून विचार केला, तर त्या भावनेच्या तडाख्यात सापडल्यापासून आणि कायमचे लुप्त होण्यापासून स्वतःचे रक्षण करणे त्याला शक्य होईल.

फ्रॉयडचे "मानसशास्त्रीय सूत्र" हे मनोविकृति निर्माण करणाऱ्या राक्षसी प्राणभूत वस्तूचे केवळ बाह्य प्रतिरूप आहे. वस्तुतः केवळ चेतनाच "भूताला" घालवून देऊ शकते– बुद्धि नव्हे. फार झाले तर बुद्धि ही फाऊस्टच्या वाग्नेरप्रमाणे केवळ साहाय्यकारी असते. भूत गाडण्याची भूमिका खेळण्याला ती क्वचितच पात्र असते.

---

मूळ लेखक : स्टीफन झ्वाईग अनुवादक : वि. ग. जोशी

# बाई

आपल्या खोलीत दोन्ही मुली एकट्याच होत्या. दिवा मालवलेला होता. त्यांच्या पलंगावर करकर आवाजाशिवाय सगळीकडे अगदी शांत होते आणि गडद काळोख पसरला होता. त्या मुलींचा श्वासोच्छ्वास अगदी नियमित होत होता. त्या झोपल्या आहेत असे वाटत होते.

"ऐकलस कां ? " एक पलंगावरून हळूच, घाबरत, घाबरत प्रश्न विचारण्यात आला. बोलणारा आवाज बारा वर्षांच्या मुलीचा होता.

"काय म्हणतेस ? " तिची बहीण म्हणाली. ही तिच्यापेक्षा एका वर्षाने मोठी होती.

"तूं जागी आहेस ! मला किती बरं वाटलं, मला तुला एक गोष्ट सांगायची आहे."

त्याला उत्तर मिळाले नाही. पण पलंगाची हालचाल झाली त्याचा आवाज आला. ती मोठी मुलगी पलंगावर उठून बसली. अंधारात तिच्या डोळ्यांची चमक दिसत होती.

"हे बघ. मिस् मनच्या वागण्यात अलीकडे जरा वेगळेपणा आला आहे असे मला वाटते. तो फरक तुला दिसला का ?"

"हो" थोड्या वेळाने दुसरी म्हणाली "काही तरी घडले आहे नक्कीच. पण काय, तेच समजत नाही. त्या पूर्वीसारख्या अगदी कडकपणे आता वागत नाहीत. दोन दिवस झाले, त्यानी दिलेले पाठ मी तयार केले नाहीत, पण याबद्दल त्या माझ्यावर रागावल्या नाहीत. काय झालय तेच समजत नाही. पण आता त्यांना आपल्याविषयी पूर्वीइतकी आस्था वाटत नाही हे नक्की. ती एकटी नुसतीच बसून राहते. पूर्वीसारख्या आपल्या खेळात भाग घेत नाहीत."

"मला वाटतं की त्या दुःखी आहेत आणि ते दुःख त्यांना आपल्याला दाखवायचे नसावे. त्या आता पियानोसुद्धा वाजवत नाहीत."

त्यानंतर थोडावेळ शांतता पसरली. मग पुन्हा मोठी मुलगी म्हणाली, "अग, तू काही तरी मला सांगणार होतीस ना."

"हो. पण दुसऱ्या कोणालाही ही गोष्ट सांगू नकोस हं. यासंबंधी आपल्या आईला किंवा तुझ्या मैत्रिणीलाही ही गोष्ट सांगू नकोस."

"हो. अगदी कुणाला सांगणार नाही. तू सांग लवकर," ती उतावळेपणाने म्हणाली.

"मी वरती झोपायला जायला निघाले ना त्यावेळी मला एकदम आठवले की आज झोपायला जाण्यापूर्वी नेहमीप्रमाणे मिस् मनना नमस्कार केलाच नाही. मग मी पायात काही न घालता, अगदी हळूच त्यांना चकीत करावे म्हणून त्यांच्या खोलीकडे गेले. त्यांच्या खोलीचा दरवाजा हळूच उघडला आणि एक क्षणभर मला वाटले की खोलीत कोणीच नाही. दिवा जळत होता. पण मला बाई दिसल्याच नाहीत. एवढ्यात मला रडण्याचा आवाज आला आणि पहाते तो बाई कपडे न बदलता अंथरुणावर पडलेल्या होत्या आणि उशीत तोंड लपवून मुसमुसत होत्या. त्यांचे रडणे ऐकून मला फार वाईट वाटले. त्यांचे माझ्याकडे लक्ष गेले नाही. मी हळूच बाहेर आले आणि दरवाजा ओढून घेतला. मी थोडावेळ तशीच दरवाजाबाहेर उभी राहिले. मला कसेतरीच वाटले. दरवाजाबाहेरही त्यांच्या रडण्याचा आवाज माझ्या कानावर पडत होता. मग मी परतले."

दोघीही गप्प बसून राहिल्या. मग मोठी बहीण सुस्कारा टाकीत म्हणाली, "गरीब बिचाऱ्या बाई !" आणि पुन्हा गप्प बसली.

"मला काहीच समजत नाही, त्या कां रडत असाव्यात ?" लहान बहीण पुन्हा म्हणाली "त्यांचे अलीकडे कोणाशी भांडण झालेले नाही. आईही त्यांना काही बोलली नाही आणि आपण दोघीजणींनीही त्यांना त्रास दिलेला नाही. मग त्या का रडत होत्या ?"

" मी सांगू ? " मोठी मुलगी म्हणाली.

" सांग. "

उत्तर थोड्या वेळाने आले. " मला वाटते की त्या कुणावर तरी प्रेम करीत आहेत. "

" प्रेम ! " लहान बहीण आश्चर्याने म्हणाली " कुणावर प्रेम बसलय त्यांचे ? "

" काय, तुझ्या लक्षात नाही कां आलं ? "

" तुला ओटोविषयी तर म्हणायचं नाही ! "

" होय. ओटोच. ओटोचेच तिच्यावर प्रेम बसले आहे. तो तीन वर्षे झाली आपल्याकडे राहतो आहे. पण आपल्याबरोबर तो कधी फिरायला आल्याचं तुला आठवतं कां ? पण आता दोन तीन महिने झाले एक दिवसही तो फिरायला आल्याशिवाय रहात नाही. मिस् मन येण्यापूर्वी त्याचे आपल्या दोघींकडे अगदी लक्ष नसायचे. पण आता तो एकसारखा आपल्या आवती भोवती फिरत असतो. मिस् मन आपल्याला बागेत, पार्कमध्ये फिरायला घेऊन जातात, त्यावेळी वाटेत त्याची कुठेतरी गाठभेट झाल्याशिवाय रहात नाही, हे तुझ्या लक्षात आले असेलच.

" होय. माझ्याही ती गोष्ट लक्षात आली होती," ती लहान मुलगी म्हणाली. "पण मला वाटले कीं . . ." पण तिने वाक्य पूर्ण केले नाही.

" मी सुद्धा या गोष्टीला विशेष महत्त्व देत नव्हते. पण काही वेळाने माझ्या लक्षात आले होते की ओटो आपला उपयोग केवळ निमित्त म्हणून करतो आहे."

त्यानंतर बराचवेळ शांतता होती. त्या दोघीजणी विचार करीत होत्या. मग ती लहान मुलगी म्हणाली, " पण असे जर असेल तर मग त्या रडतात कां ? त्या ओटोला फार आवडतात. प्रेम करण्यात मोठी गंमत असणार."

" बरोबर आहे मलाही तसंच वाटते." मोठी मुलगी स्वप्नाळू वृत्तीने म्हणाली, " काय आहे कुणास ठाऊक?"

मग पुन्हा ती लहान मुलगी म्हणाली " बिचाऱ्या मिस् मन. " त्या रात्री त्यांचे बोलणे इथेच थांबले.

सकाळी पुन्हा या विषयावर त्यांचे बोलणे झाले नाही. पण त्या दोघीही याच विषयासंबंधी विचार करीत होत्या यांत शंका नाही. ज्यावेळी त्यांची दृष्टी प्रत्येक वेळी त्यांच्या या दृष्टीक्षेपात काही विशेष अर्थ होता असेही नाही. जेवणाच्या वेळी दोघी बहिणींनी ओटोचे अगदी अलिप्तपणे निरीक्षण केले. त्या दोघीजणी त्याच्याशी काही बोलल्या नाहीत. त्याच्यामध्ये आणि मिस् मन मध्ये कोणते गुप्त रहस्य दडलेले आहे याचा जणू कांही त्या आपल्या नजरेने शोध घेत होत्या. त्यांचे खेळण्यातही मन लागेना. या गूढ रहस्याव्यतिरिक्त दुसरा विचारच त्यांना सुचत नव्हता.

सायंकाळी एकीने दुसरीला विचारले. " तुला आज काही नवीन दिसले का ? "

" नाही " दुसरी हळूच उत्तरली. या विषयावर बोलतांना त्या घाबरत होत्या. याच प्रकारे काही दिवस गेले. दोघी बहिणी अस्थिर मनाने, गुपचुप सगळे काही लक्ष देऊन पहात होत्या आणि लवकरच आपल्याला या रहस्याचा शोध लागेल असे त्यांना वाटत होते.

शेवटी एके दिवशी जेवणाच्या वेळी लहान मुलीला दिसले की बाईंनी ओटोला काही खूण केली आणि त्यानेही मानेनेच होकार दिला. न राहवून लहान बहिणीने टेबलाच्या खालून पायाने आपल्या बहिणीकडे पाहिले. लहान बहिणीने खुणेनेच तिला सांगितले. जेवण संपेपर्यंत त्या अगदी उत्तेजित झालेल्या दिसत होत्या. जेवण झाल्यावर त्या दोघीजणींना बाई म्हणाल्या " वाचायच्या खोलीत चला आणि तेथे काहीतरी वाचत बसा. माझे डोके दुखते आहे आणि मला अर्धा तास तरी पडून राहिले पाहिले पाहिजे. "

एकांत मिळाल्याबरोबर लहान बहीण म्हणाली " पहा, ओटो आता त्यांच्या खोलीकडे जाईल."

" नक्कीच " दुसरी म्हणाली, म्हणूनच तर त्यांनी आपल्याला इकडे पाठवले.

" आपण दरवाजाबाहेरून ऐकू या. "

" पण तेवढ्यात कोणी आले तर. . "

" कोण येणार ? "

" आई "

" मग मात्र फारच पंचाईत होईल." लहान मुलगी घाबरत म्हणाली.

" हे बघ मी ऐकते आणि तू रस्त्याकडे नजर ठेव. "

लहान मुलीला थोडे वाईट वाटले. " पण तू सगळे मला सांगणार नाहीस. "








" नाही ग. अगदी सगळं सांगेन. "

" अगदी शपथ ! "

" हो. अगदी शपथ. कोणी आलं तर खोकून मला खूण कर. "

त्या दोघीजणी बाहेर उभ्या राहिल्या –पुढे काय होणार या औत्सुक्याने दोघीचीही हृदये धडधडत होती. तेवढ्यात पावले ऐकू आली आणि त्या दोघीजणी वाचनाच्या खोलीत गेल्या. हो, तो ओटोच होता. तो मिस् मनच्या खोलीत शिरला आणि त्याने दरवाजा ओढून घेतला. मग ती मोठी मुलगी पुढे झाली आणि दरवाज्याजवळ उभी राहून किल्लीच्या भोकातून आतले बघण्याचा प्रयत्न करू लागली. त्या लहान मुलीला तिचा हेवा वाटत होता. तिला राहवले नाही आणि तीही दरवाजाजवळ आली. पण तिच्या मोठ्या बहिणीने रागाने तिला बाजूला सारले आणि खूण करून सांगितले की दुसऱ्या बाजूने कोणीतरी येईल त्याच्याकडे लक्ष ठेवले पाहिजे. मग ती काही वेळ ऐकत होती –पहात होती. लहान मुलीला औत्सुक्य वाटत होते. तिची मोठी बहीणच सगळे ऐकत आहे हे पाहून तिला आपल्यावर ताबा ठेवणे फार कठीण जात होते. तिला रडायला यायला लागले. शेवटी अगदी न राहवून काही आवाज ऐकल्यावर तिने एकदम खोकून मोठ्या बहिणीला खूण केली. त्या बरोबर दोघी बहिणी दुसऱ्या खोलीत पळाल्या आणि मग थोडावेळ गुपचुप उभ्या राहिल्या. मग ती लहान मुलगी उत्सुकतेने म्हणाली– हं, सांग आतां सगळं"

" मोठी मुलगी एकदम चमकली आणि आपल्याशीच बोलल्यासारखी म्हणाली, " मला समजत नाही, काय म्हणालीस. "

" काय ? "

" फारच विचित्र गोष्ट आहे. "

" काय ? काय ? " ती लहान मुलगी अधीरतेने म्हणाली मग मोठ्या बहिणीने सांगण्याचा प्रयत्न केला.

"आपण काय समजत होतो आणि ही गोष्ट वेगळीच दिसते आहे. मला वाटते की ओटो खोलीत गेल्यावर मिस् मनला जवळ घेण्याचा आणि त्यांचे चुंबन घेण्याचा प्रयत्न त्याने केला असणार. कारण मिस् मन म्हणाली, " आतां नको. थांब. मला काही गंभीर घटना तुला सांगायची आहे." मला नीट दिसत नव्हते कारण कुलुपात किल्ली अडकवलेली होती त्यामुळे नीट दिसत नव्हते. पण स्पष्ट ऐकायला येत होते. " का, काय सांगायचे आहे ? " ओटो म्हणाला. यावेळच्या सारखा त्याचा आवाज पूर्वी कधीच ऐकला नव्हता. तो नेहमी कसा बोलतो तुला माहिती आहे ना - किती मोठ्याने बोलत असतो. पण यावेळी त्याचा आवाज घाबरल्यासारखा वाटत होता आणि मिस् मननी ओळखले असावे की हा बनवतो आहे. तेव्हा त्या म्हणाल्या, " मला वाटतं कीं तुला समजले आहे ? " "नाही, काही समजलेले नाही." "तर मग," मिस् मन अगदी करुण आवाजात म्हणाल्या, " तूं माझ्यापासून असा दूरदूर कां राहतो आहेस ? एक आठवडा झाला तूं माझ्याशी नीट बोललाही नाहीस. तूं मला शक्यतो टाळण्याचा प्रयत्न करतो आहेस. मुलींच्या बरोबर तूं हल्ली फिरायला येत नाहीस. आम्हाला पूर्वीप्रमाणे पार्कमध्ये भेटत नाहीस. तुला माझ्याविषयी एकदम काहीच वाटेनासे झाले आहे ना ! तूं माझ्यापासून कां दूर होतो आहेस, तुला त्याची माहिती आहे होय ना." क्षणभर काहीच उत्तर आले नाही. मग तो म्हणाला "माझी परीक्षा किती जवळ आली आहे, ते तुला माहिती आहे. वाचनाशिवाय इतर गोष्टी करण्यासाठी माझ्याजवळ वेळ तरी आहे कां ? तेव्हा तूंच सांग, मी तरी काय करणार ?" बाई रडायला लागल्या. मग त्या म्हणाल्या, " ओटो, खरं खरं सांग. मी काय केलं म्हणून तूं असं वागतो आहेस ? माझा तुझ्यावर काहीच हक्क नाही कां ? आपण सरळ स्पष्ट बोलले पाहिजे. तुझ्या चेहऱ्यावरून मला समजते आहे की तुला सगळी काही माहिती आहे. "

ती मोठी मुलगी ते वाक्य पुरे करू शकली नाही. मग ती लहान मुलगी अगदी तिच्याजवळ गेली आणि म्हणाली " कशाविषयी ग ! "

" आपल्या मुलाविषयी. "

" त्यांच्या मुलाविषयी ! " ती लहान मुलगी म्हणाली, " लहान मूल ! अशक्य ! "

" मिस् मन तर हेच म्हणाल्या. "

" तूं नीट ऐकले नसशील. "

" मी नीट ऐकले. मी अगदी बरोबर सांगते आहे. आणि त्यानंतर ओटो म्हणाला " आपले








मूल!" आणि थोडयावेळाने बाइ म्हणाल्या, " आता आपण काय केले पाहिजे ? नंतर . . ."

" नंतर ? "

" नंतर . . . याचवेळी तूं मला खूण केलीस आणि आपण दोघी पळत आलो. ती लहान मुलगी आणखीच चकित झाली.

" पण त्यांना मूल कुठले असणार ? आणि असेल तर मग कुठे आहे ? "

" मलाही तुझ्यापेक्षा कुठे जास्त माहिती आहे ? "

" कदाचित् बाईंनी ते घरी ठेवले असेल. आईने ते मूल इथे आणायला परवानगी दिली नसेल म्हणूनच बाई दुःखी दिसतात. "

" अग पण त्यावेळी बाई ओटोला ओळखत सुद्धा नव्हत्या."

त्यांनी खूप वेळ विचार केला. पुन्हा ती लहान मुलगी म्हणाली, " मूल ! हे शक्य नाही. त्यांना मूल असेलच कसे ? बाईंचे काही लग्न झालेले नाही आणि लग्न झालेल्या व्यक्तींनाच मुले होतात."

" पण बाईंचे लग्न झाले असेल ? "

" किती मूर्ख आहेस ग. पण त्यांचे लग्न ओटोशी झालेले नाही हे नक्की."

" पण मग ? "

त्या दोघींनी एकमेकींकडे पाहिले.

" गरीब बिचाऱ्या मिस् मन् ! " एक अतिशय दुःखाने म्हणाली.

त्यांच्या बोलण्यात थोड्या थोड्या वेळाने हे सहानुभूतीपूर्ण शब्द वारंवार येत होते. पण त्यांचे कुतूहल काही संपलेले नव्हते.

" ते मूल म्हणजे मुलगा असेल का मुलगी ? तुला काय वाटते ? "

हे मी कसे सांगू शकेन ? "

' त्यांनाच जरा चतुराईने आपण विचारले तर ? "

' वा ! गप्प बैस ! "

" काय हरकत आहे ? त्या आपल्याशी अलीकडे अगदी ममतेने वागतात. "

" काय उपयोग ! या प्रकारच्या गोष्टी त्या आपल्याला सांगत नाहीत आणि अशा गोष्टी चालल्या असतील तर आपण तेथे गेल्यावर त्याविषयी बोलणे बंद होते आणि उगीचच इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलायला सुरुवात होते. जसे काही आम्ही अगदी कुक्कुलं बाळ आहोत. मी तर आता तेरा वर्षांची झाले. विचारून काही फायदा होणार नाही. उत्तर देण्याची टाळाटाळ होईल. "

पण मला जाणण्याची इच्छा आहे. "

" मलाही. "

" मला हेच समजत नाही की ओटो तर हे माहिती नसल्यासारखा दाखवत होता. कुणाला मूल असले तर ते माहिती असणारच. आई वडील आहेत हे नाही कां माहिती असत."

" अग. तो उगीच बनवत असेल. तो नेहमीच असं वागत असतो. "

" पण ही गोष्ट तशी नाही. आपली खोडी काढायची असली म्हणजेही तो तसाच वागतो. "

एवढयात बाई आल्यामुळे त्यांचे बोलणे थांबले आणि दोघीही अगदी कामात गर्क आहेत असे दाखवू लागल्या. पण त्यांच्या लक्षात आले की बाईंचे डोळे लाल झाले आहेत आणि त्यांचा आवाज कापत आहे. मुली त्यांच्याकडे सहानुभूतीने पहात गप्प बसल्या होत्या. " त्यांचे मूल असणारच, " त्या दोघी विचार करीत होत्या, "म्हणूनच त्या एवढ्या दुःखी दिसतात" पण त्या मुलींवरही ती दुःखाची छाया न कळत पडली होती.

दुसऱ्या दिवशी जेवणाच्या वेळी त्यांना विचित्र बातमी ऐकायला मिळाली. ओटो निघून चालला होता. त्याने आपल्या काकांना सांगितले होते की परीक्षा जवळ आल्यामुळे आणखी अभ्यास करणे आवश्यक आहे आणि घरात काहीना काही तरी अडथळे येतात म्हणून दोन महिने बाहेरच खोली घेऊन रहायचा विचार आहे.

त्या दोघी मुलींची उत्सुकता शिगेला पोहोचली होती. त्या मुलींना खात्री होती की ओटो बाहेर बाहेर निघाला आहे त्याला कारण म्हणजे कालचा तो संवाद. त्यांना वाटले की तो भित्र्यासारखा पळून चालला आहे. ओटो जेव्हा निरोप घ्यायला आला, तेव्हा त्या दोघीही त्याच्याशी मुद्दामच बोलल्या नाहीत. पण मिस् मनचा त्याने घेतलेला निरोप

त्यांनी लपून पाहिला. मिस् मन त्याच्याशी हस्तांदोलन करताना शांत वाटत होत्या. पण त्यांचे ओठ मात्र कापत होते.

त्या मुलींच्या वागण्यात. आता फार फरक पडला. त्या कधीतरी हसत. त्यांना कोणत्याच गोष्टीत आनंद वाटत नव्हता आणि त्या अतिशय उदास, दुःखी होत्या. त्या इकडेतिकडे उगीचच हिंडत. त्यांचा मोठया माणसांच्या बोलण्यावर विश्वास बसत नव्हता. त्यांच्या साध्या बोलण्यातही काहीतरी आपल्याला फसवायचा बेत असणार असेच त्यांना वाटत होते. त्या नेहमी छायेप्रमाणे अगदी गुपचुप इकडून तिकडे जात आणि दरवाजा पाठीमागे उभ्या राहून ऐकण्याचा प्रयत्न करीत. त्यांच्या सभोवती पसरलेल्या रहस्यमय जाळ्यातून बाहेर पडण्याचा त्या प्रयत्न करीत. कमीतकमी निदान खरं काय आहे त्याची थोडीशी माहिती व्हावी अशी त्यांची इच्छा होती. बालपणीचा अंध विश्वास आता उरला नव्हता. नेहमी त्यांना वाटे की नवीन काहीतरी ऐकायला मिळेल. हे छळणारे वातावरण त्यांना इतरांचा छळ करण्याची प्रेरणा देत होते. जेव्हा त्यांचे आईवडील जवळ असतील त्यावेळी आपण अगदी खेळात गुंग झाले आहोत असे दाखवीत. मोठयांच्या जगाविरुद्ध त्या दोघींचे एकच समान कारण असल्यामुळे त्या दोघी याबाबतीत एकमेकींच्या आणखी जवळ आल्या होत्या. त्या दोघी एकमेकींना आलिंगन देवून समाधान शोधण्याचा प्रयत्न करीत आणि कधी दोघीही रडायला लागत. काहीच कारण नसताना त्यांच्या जीवनात एक क्रांतिकारक काळ आला होता.

त्यांच्या इतर दुःखात एक गोष्ट सगळयात दुःखदायक होती. त्या दोघींनी जणू काही पक्के ठरवले होते की बाई फार दुःखी आहेत तेव्हा त्यांना त्रास होईल असे वागायचे नाही. त्या आपापला अभ्यास करीत एवढेच नाही तर एकमेकींना मदत करीत आणि नेहमी शांतपणे आणि सभ्यपणे वागत आणि आपल्या बाईंची इच्छा लक्षात घेऊन वागण्याचा प्रयत्न करीत. पण बाईंचे मात्र त्यांच्याकडे लक्ष नव्हते आणि याचेच त्यांना सर्वात जास्त दुःख वाटत होते. बाई आता अगदी बदलल्या होत्या. एखादेवेळी त्या दोघी बहिणीपैकी एखादी जर बाईंशी बोलली, तर बाई एकदम झोपेतून जाग्या झाल्यासारख्या चमकत आणि कुठल्यातरी दूर देशी गेलेली त्यांची दृष्टी मग परत येई. त्या तासन्तास विचार करीत बसत आणि त्या मुली अगदी आवाज न करता इकडे तिकडे जा-ये करीत. आपल्या इथे नसणाऱ्या मुलाविषयी बाई विचार करीत आहेत असे मुलींना वाटे. आपल्यामधील स्त्रीत्वाच्या या नवीन जाणिवेमुळे त्या आपल्या बाईंविषयी आणखी स्नेह दाखवीत आणि मिस मनचे वागणेही गोडीचे वाटत होते. मिस् मन पूर्वी काहीशा कडकपणाने आणि वेगळेपणाने वागत. पण आता त्यांचे वागणे फार विचारपूर्वक आणि विवेकपूर्व असे. त्यांच्या प्रत्येक कार्यात मुलींना गुप्त वेदनाच दिसत होत्या. बाईंना प्रत्यक्ष रडताना त्यांनी पाहिले नाही, पण त्यांचे डोळे नेहमी लाल दिसत. अगदी स्पष्ट होते की बाईंना आपली दुःखे इतरांना सांगावयाची नव्हती आणि आपण बाईंना काहीच मदत करू शकत नाही म्हणून मुलींना फार वाईट वाटत होते.

एके दिवशी बाई खिडकीकडे तोंड करुन डोळे पुसत होत्या. त्यावेळी लहान मुलीने त्यांचा हात धरण्याचे धाडस केले आणि ती म्हणाली, "मिस् मन-तुम्ही दुःखी आहात, आमच्याकडून काही चूक झाली का ?"

"बाईंनी मोठया प्रेमाने तिच्याकडे पाहिले आणि तिला थोपटले आणि म्हणाल्या "नाही ग, तुमचा काहीच दोष नाही" बाईंनी तिच्या कपाळाचे चुंबन घेतले.

त्या दोघी मुलींचे सारखे लक्ष होते. एके दिवशी बैठकीच्या खोलीत अचानक गेल्यावर एखाददुसरा शब्द एकीच्या कानावर पडला. पण तिच्या आईवडिलांनी तिला पाहिल्यावर लगेच बोलणे बदलले. पण तिला विचार करण्यास पुरेल एवढे शब्द तिच्या कानावर पडले होते.

"होय. मलाही त्याचीच शंका येते आहे." आई सांगत होती, "मला वाटते की, आतां मला यासंबंधी तिच्याशी बोललेच पाहिजे." एवढेच त्या मुलीने ऐकले होते. ती आपल्या बहिणीशी विचारविनिमय करण्यासाठी धावली.

"कोणत्या गोष्टीसंबंधी हे बोलणे चालले असेल बरं ?"








पण जेवणाच्या वेळी त्यांच्या लक्षात आले कीं आपले आईवडील एकसारखे बाईच्याकडे पहात आहेत आणि डोळयांनी एकमेकांना खुणा करीत आहेत. जेवण झाल्यावर त्यांच्या आईने मिस् मनना म्हटले, " जरा माझ्या खोलीत येण्याची कृपा कराल काय ? मला आपल्याशी काही बोलायचे आहे."

त्या मुलींच्या औत्सुक्याला सीमा राहिली नाही. काहीतरी घटना घडणार आहे हे नक्की ! लपून बातम्या ऐकण्याची आतां त्यांना सवय झाली होती. त्यांना याबद्दल काहीच लाज वाटत नव्हती. आपल्यापासून कोणती गोष्ट लपवून ठेवण्यात येत आहे हेच जाणून घेण्याचा त्यांचा उद्देश होता. मिस् मनने आईच्या खोलीत प्रवेश केल्याबरोबर त्या दोघीही दरवाजाजवळ गेल्या.

त्या ऐकू लागल्या. प्रथम स्पष्टपणे काहीच ऐकू येत नव्हते. काहीतरी अस्पष्ट आवाजांत चाललेला संवाद कानावर पडत होता. आपल्याला काहीच समजणार नाही का ? तेवढ्यात उंच चढलेला आवाज ऐकू आला, त्यांची आई रागाने म्हणाली " आम्ही सगळे आंधळे आहोत अशी तुमची समजूत आहे काय ? तुमची स्थिती आमच्या लक्षातच येणार नाही असे तुम्हाला वाटले काय ? शिक्षिकेच्या कर्तव्यासंबंधी तुमची काय भावना आहे ते यामुळे चांगले समजले. मला अतिशय वाईट वाटते की तुमच्यासारख्या शिक्षिकेच्या हाती मी माझ्या मुलींना सोपवले. तुम्ही आपल्या कर्तव्याचे पालन नीट केले नाही यात काय शंका ? " शिक्षिका काहीतरी उत्तर देत होती. पण अगदी शांतपणे. त्यामुळे त्यांचे बोलणे मुलींना ऐकू गेले नाही. " बोला ! बोला ! प्रत्येक अपराधी काहीतरी कारण शोधत असतोच. तुमच्यासारख्या स्त्रीने जीवनामध्ये प्रथमच प्रवेश करणाऱ्या माणसाला भावी परिणामांचा काहीही विचार न करता सर्वस्व द्यावे ही किती भयानक गोष्ट आहे ! मी तुम्हाला यानंतर माझ्या घरी राहू देईन असे तुम्हाला वाटते काय ? "

दरवाजाबाहेर उभ्या असणाऱ्या मुली शहारल्या. त्यांना सगळे समजत नव्हते. पण आईचा आवाज फार चढलेला वाटत होता. मिस् मन फक्त मुसमुसून रडत होत्या. त्या मुलींच्याही डोळयातून अश्रू वाहू लागले. त्यांची आई आणखी रागावली, " आता रडण्यामेकण्याशिवाय तुम्ही दुसरे काय करणार ! तुमच्या रडण्यामुळे मी विरघळणार नाही –तुमच्यासारख्या स्त्रियांविषयी माझ्या मनात सहानुभूती नाही. तुमचे पुढे काय होणार याचा विचार करून मला काय करायचे आहे ? तुम्ही यापुढे कोणाची मदत मागावी हा तुमचा प्रश्न आहे. मी एवढेच सांगते की तुम्ही एक दिवसहि आतां आमच्या घरी राहू नये.

मिस् मनचे निराशेने मुसमुसणे हेच त्याचे उत्तर होते. याप्रमाणे कोणी रडलेले त्या मुलींनी कधीच ऐकले नव्हते. याप्रमाणे रडणाऱ्या व्यक्तीच्या हातून काही चूक होणेच शक्य नाही अशी त्यांची भावना होती. त्यांच्या आईचा आवाज थोडावेळ थांबला आणि पुन्हा ऐकू येऊ लागला. " बस्स एवढेच मला सांगायचे होते. आजच तुमच्या सगळ्या सामानाची बांधाबांध करा आणि उद्या सकाळी पगार घेण्यासाठी माझ्याकडे या. आता तुम्ही जाबू शकता. "

त्या दोघी मुली आपल्या खोलीकडे परतल्या. काय झाले आहे ? आई इतकी कां रागावली आहे ? सत्याचा थोडासा किरण त्यांना दिसू लागला होता. आणि प्रथमच त्यांच्या मनात आईवडिलांविरुद्ध बंड करण्याची भावना निर्माण झाली.

" मिस् मनला अशाप्रकारे आईने बोलणे चांगले दिसते कां ? " मोठी मुलगी म्हणाली. लहान मुलीला एकदम स्पष्टपणे अशी टीका करणे शक्य झाले नाही आणि मग अडखळत ती म्हणाली–, " पण . . पण . . मिस् मनने काय केले ते आपल्याला माहिती नाही."

" मिस् मनने काहीच चूक केलेली नाही. माझी अगदी खात्री आहे. मिस् मन कधीच चूक करणार नाहीत. आपल्याला त्यांचा स्वभाव इतका माहिती आहे, तितका आईलासुद्धा माहिती नाही. "

" किती रडत होत्या त्या ! मला तर फारच वाईट वाटले."

" हो मलाही फार वाईट वाटले आणि आई किती मोठ्याने त्यांच्या अंगावर ओरडत होती. "

दोघींच्या डोळयातून अश्रू वाहू लागले.

याचवेळी मिस् मन खोलीमध्ये आल्या. त्यांचा चेहरा अगदी उतरलेला होता.










" मुलींनो, मला आज दुपारी बरेच काम करायचे आहे. तुम्ही आज आपल्या खोलीत खेळा. तुम्ही दंगामस्ती करणार नाही याची मला खात्री आहे. संध्याकाळी पुन्हा आपण भेटू. "

त्या वळल्या आणि मुलींचे उदासवाणे चेहरे न पाहवून त्या खोलीच्या बाहेर पडल्या.

" पाहिलेस ना, त्यांचे डोळे किती लालसर झाले आहेत ! आई त्यांच्या बाबतीत एवढी निष्ठुर का झाली आहे तेच समजत नाही. "

" गरीब बिचाऱ्या बाई. "

त्यानंतर त्या दोघीही रडायला लागल्या. त्यांची आई त्यांच्या खोलीत आली आणि तिच्याबरोबर फिरायला येणार कां म्हणून विचारू लागली.

" आज नको, आई ! "

खरं म्हटलं तर त्या आपल्या आईला घाबरल्या होत्या आणि तिच्यावर रागावल्या होत्या कारण मिस् मनला कामावरून दूर केले आहे हे त्यांना आईने सांगितले नव्हते. यावेळी त्यांना एकांताची आवश्यकता वाटत होती. एखाद्या पिंजऱ्यात अडकलेल्या पक्ष्याप्रमाणे प्रतारणा आणि फळ यांच्या प्राण घेणाऱ्या वातावरणात त्या दोघी खोलीतल्या खोलीत इकडे तिकडे हिंडत होत्या. त्यांना वाटत होते कीं मिस् मनना जाऊन विचारावे की हे काय चालले आहे आणि त्यांना सांगावे की आम्ही तुम्हांला जावू देणार नाही. आणि आमच्या आईने तुमच्यावर फार अन्याय केला आहे. पण त्यांना वाईट वाटेल याचीच त्यांना भीती वाटली. त्याशिवाय दरवाजा पाठीमागे उभे राहून चोरून ज्या गोष्टी आपण ऐकल्या त्या गोष्टी त्यांना सांगायच्या याचीही त्यांना लाज वाटत होती. याच काळजीत त्यांनी कशीतरी दुपार घालवली. कधी त्या रडत होत्या तर कधी त्यांना दरवाज्या आडून ऐकलेल्या गोष्टी आठवत होत्या. कधी त्यांना आपल्या आईचा निर्दयीपणा आणि कधी बाईंचे निराशेने रडणे आठवत होते.

त्यांच्या बाई संध्याकाळी त्यांना भेटायला आल्या आणि नमस्ते करून लगेच निघून चालल्या. बाई खोलीतून बाहेर पडतांना त्यांच्याशी काहीतरी बोलावे आणि ही शांतता नाहीशी करावी असे मुलींना वाटत होते. पण त्या एक शब्दही बोलू शकल्या नाहीत. दरवाजापाशी गेल्यावर मिस् मन पुन्हा परतल्या. जणू काही मुलींच्या इच्छाशक्तीनेच त्यांना परत आणले होते. त्यांचे डोळे भरून आले होते. त्यांनी मुलींना जवळ घेतले आणि त्या रडायला लागल्या. मग पुन्हा एकदा त्या मुलींचे चुंबन घेऊन बाई चटकन निघून गेल्या.

यानंतर आता बाई आपणाला भेटणार नाहीत हे मुलींना समजले.

" आता त्यांना कधीच पाहू शकणार नाही " रडत रडत एक म्हणाली.

" होय. आपण उद्या शाळेतून घरी येऊ त्यापूर्वीच बाई निघून गेलेल्या असतील. "

" काही दिवसानंतर एखादेवेळी आपण त्यांना भेटू शकू, त्यावेळी त्या आपल्याला आपले मूल दाखवतील."

" होय. किती गोड स्वभावाच्या आहेत, मिस् मन. "

" गरीब बिचाऱ्या बाई ! "

" मला समजत नाही, आपण त्यांच्याशिवाय कसं काय राहणार ? "

" त्यांच्यानंतर दुसऱ्या एखाद्या बाई मला कधीच आवडणार नाहीत. "

" मलाही. "

" आपल्या या बाईसारखी दुसरी मिळणेच शक्य नाही. शिवाय ... "

ती हे वाक्य पूर्ण करू शकली नाही. विशेषतः ज्या वेळेपासून त्यांना समजले होते की मिस् मन मुलासाठी दुःखी आहे, त्यावेळेपासून त्यांच्याविषयी मुलींच्या स्त्रीहृदयात श्रद्धेची भावना निर्माण झाली होती.

" हे पहा, " एक म्हणाली.

" काय ? "

" मला एक कल्पना सुचली आहे. आपण त्या निघून जाण्यापूर्वी असे काही तरी करू या की त्यावरून त्यांना समजेल की आपण दोघी त्यांच्यावर किती प्रेम करीत आहोत आणि आपण आईसारख्या वागणाऱ्या नव्हेत ! तू या बाबतीत मला मदत करशील ना ? "

" जरूर "

" त्यांना पांढरी गुलाबाची फुले किती आवडतात ते तुला माहितीच आहे. आपण उद्या लवकर अगदी











बाहेर जाऊ या आणि शाळेत जाण्यापूर्वी काही फुले विकत घेऊ या आणि मग ती फुले आपण त्यांच्या खोलीत ठेवू या. ''

'' पण केव्हा ? ''

'' शाळा सुटल्यावर. ''

'' त्याचा काहीच उपयोग नाही. त्या शाळा सुटण्यापूर्वीच निघून गेलेल्या असतील. आपण सकाळची न्याहारी करतो ना त्यापूर्वी मी हळूच बाहेर जाईन आणि फुले घेऊन येईन. मग आपण ती फुले त्यांना देऊं. ''

'' ठीक आहे. उद्यां अगदी लवकर उठले पाहिजे. ''

मग त्यांनी आपल्या पैशाच्या पेट्या शोधल्या आणि आपण बाईंना आपले त्यांच्यावर असलेले प्रेम दाखवू शकणार याचा त्यांना आनंद झाला.

अगदी सकाळी हातात गुलाबाची फुले घेऊन त्यांनी मिस् मनच्या दरवाजावर टक्टक् केले. त्यांना उत्तर मिळाले नाही. बाई बहुतेक झोपलेल्या असतील म्हणून त्यांनी हळूच खोलीत पाहिले तर खोली रिकामी होती. अंथरुणावर कोणी झोपल्याची खूणही दिसत नव्हती. टेबलावर दोन चिठ्ठ्या ठेवलेल्या होत्या. त्या मुलींना आश्चर्य वाटले काय झाले आहे कुणास ठाऊक ?

''मी सरळ आईकडे जाते.'' मोठी मुलगी म्हणाली. अगदी न घाबरता आईकडे जावून तिने विचारले,

'' मिस् मन कुठे आहेत ?''

'' आपल्या खोलीत असतील.''

'' त्यांच्या खोलीत कोणीच नाही. त्या रात्री झोपल्या नाहीत असे वाटते. त्या रात्रीच निघून गेल्या असाव्यात. तुम्ही सर्वांनी याबाबतीत आम्हांला कां सांगितले नाही?''

मुलीचा हा वेगळा रागीट आवाज आईच्या तितकासा लक्षात आला नाही. पण आई घाबरली आणि लगेच आपल्या पतींना घेऊन मिस् मनच्या खोलीकडे गेली.

त्यांचे वडील मिस् मनच्या खोलीत बराच वेळ होते. मुली आपल्या आईकडे अतिशय रागीट नजरेने पहात होत्या. पण आईला त्यांच्या नजरेला नजर देण्याची शक्ती उरली नाही.

थोड्यावेळाने वडील मिस् मनच्या खोलीतून बाहेर आले. त्यांच्या हातात एक उघडलेले पत्र होते. वडीलही घाबरल्यासारखे दिसत होते. आईवडील दोघेही आपल्या खोलीत गेले. आणि अगदी हळू आवाजात बोलत बसले. यावेळी मुली त्यांचे बोलणे चोरून ऐकायला घाबरल्या. आपल्या वडिलांना इतके घाबरलेले त्यांनी यापूर्वी कधीच पाहिले नव्हते.

त्यानंतर त्यांचे आई वडील खोलीच्या बाहेर आले त्यावेळी त्यांच्या लक्षात आले की आई रडत असली पाहिजे. त्यांना आईला प्रश्न विचारायचा होता. पण आई अगदी रागाने म्हणाली '' तुम्ही लगेच शाळेला जा. तुम्हाला उशीर होईल. ''

त्यांना शाळेला जावे लागले. कितीतरी तास त्या आपल्या वर्गात बसल्या होत्या पण शिकविण्यातला एकही शब्द त्यांना समजला नाही. त्या नंतर त्या घरी परतल्या.

घरचे सगळे वातावरण विचित्र वाटत होते. नोकरांच्या चेहऱ्यावरसुद्धा ती विचित्र भावना दिसत होती. आई त्यांना भेटली आणि तिने अगदी पुष्कळ प्रयास करून म्हटले. '' मुलींनो, आता तुम्ही मिस् मनला पुन्हा पाहू शकणार नाही. त्या... ''

ते वाक्य आईला पूर्ण करता आले नाही. त्या मुलींच्या चेहऱ्यावर एवढे कठोर आणि रागीट भाव दिसत होते की त्या खोटे बोलू शकल्या नाहीत. त्या वळल्या आणि आपल्या खोलीत निघून गेल्या.

त्या दिवशी दुपारी ओटो परत आला. त्या दोन्हीपैकी एक पत्र त्याच्या नांवे होते आणि म्हणूनच त्याला बोलावणे पाठवले होते. त्याचा चेहरा अगदी पडला होता आणि त्याची मनःस्थिती ठीक दिसत नव्हती. कोणीच त्याच्याशी बोलले नाही. प्रत्येकजण त्याला टाळायला पहात होता. त्या दोघी मुली उदासवाण्या चेहऱ्याने कोपऱ्यात बसलेल्या पाहिल्यावर ओटो त्यांच्याजवळ गेला. '' तूं आमच्याजवळ येऊ नकोस ! '' दोघी एकदम ओरडल्या. तो थोडावेळ उगीचच खोलीत इकडेतिकडे हिंडला आणि मग निघून गेला. त्या मुलींशी कोणीही बोलले नाही आणि त्याही एकमेकींशी बोलल्या नाहीत. त्या मुली या खोलीतून त्या खोलीत उगीचच हिंडत होत्या आणि वाटेत एकमेकींची गाठभेट झाली तरी अश्रू भरलेल्या डोळ्यांनी त्या एकमेकींकडे पहात होत्या. त्यांना आता

सगळे समजले होते. त्यांना माहिती झाले होते कीं आपल्याला फसवले आहे. मनुष्य किती खालच्या पातळीवर जाऊ शकतो हे त्यांना कळले होते. त्यांना आईवडिलांविषयी तितकेसे प्रेम वाटत नव्हते. आणि यापुढे त्यांच्यावर विश्वास ठेवावा असेही वाटेना. किंबहुना यापुढे कोणावरही विश्वास ठेवता येणार नाही असे त्यांना वाटले. जीवनाचा सगळा भार जणू काही त्यांच्या कोमल खांद्यावर पडला होता. त्यांचे निष्काळजी, आनंदी बाळपण पाठीमागे पडले आणि अज्ञात भयाने त्यांचा भविष्यकाळ भरल्यासारखा वाटू लागला. या सगळ्या घटनेचे संपूर्ण महत्व त्यांना समजले नाही, पण ती घटना समजून घेण्याची त्यांची धडपड चालली होती. त्या शून्यतेमुळे दोघीजणी आणखी एकमेकींजवळ आल्या होत्या. पण त्या शून्यतेचा अजून त्यांनी भंग केला नव्हता. जणूं कांही मोठ्या माणसाशी त्यांचा संबंध तुटला होता. कोणीही त्यांच्याजवळ जाऊं शकत नव्हते कारण कदाचित् कित्येक वर्षे त्यांच्या आत्म्याचे द्वार बंद राहणार होते. केवळ एका लहानशा दिवसात ह्या कितीतरी मोठ्या झाल्या होत्या.

सायंकाळी जेव्हा त्या आपल्या खोलीत गेल्या तेव्हा एकांतवासाचे बालसुलभ भय, त्या मृत स्त्रीचे भय आणि इतर अनेक भयावह शंका यांनी त्यांच्या मनात गर्दी केली. भयानक थंडी होती आणि दिवसभराच्या गडबडीत उष्णता निर्माण करणारे यंत्र सुरू करण्याचे कोणाच्या लक्षातच आले नव्हते. त्या दोघी एकाच बिछान्यात शिरल्या आणि एकमेकींना धीर देण्यासाठी आणि उष्णतेसाठी त्या दोघीही जवळजवळ झोपल्या. त्या अजून काहीच बोलल्या नाहीत. यावेळी एकमेकींच्या सहवासात जवळजवळ पडल्या पडल्या त्या दोघीही मुसमुसून रडत होत्या. त्या दोघीही मिस् मनसाठी किंवा आई वडिलांच्या छळामुळेही रडत होत्या असे नाही. पण ज्या अज्ञात आणि अजब जगात सत्याचे किंचित् दर्शन त्यांना आज घडले होते त्या जगात आपले कसे होणार हाच विचार त्यांच्या मनात येत होता आणि त्या रडत होत्या. ज्या जीवनात त्या वाढत होत्या त्या जीवनात त्यांचा थरकाप होत होता. ज्या जीवनातून आपल्याला वाटचाल करायची आहे ते जीवन जंगली, भयानक श्वापदांनी भरलेले आहे याची त्यांना जाणीव झाली. पण काही वेळानंतर हे भय किंचित् कमी होऊ लागले, त्यांचे रडणेही कमी झाले आणि आता काही वेळ त्यांचे रडणे मधूनमधून थांबलेही. मग त्यांनी शांततेचा सुस्कारा टाकला आणि थोड्या वेळाने त्या दोघी झोपल्या.

---








## वाचकांचा-पत्रव्यवहार

### जेधे शकावलीमधील सर्जाखानाच्या – कैदेची चुकीची तारीख

श्री. संपादक, नवभारत,

इतिहाससंशोधक आपटे व दिवेकर यानी संपादिलेल्या " शिवचरित्र प्रदीप " या साधनग्रंथात लोकमान्य टिळक यानी जेधे शकावली प्रसिद्ध केली. तिच्यातील घटनांच्या तारखा बऱ्याच अंशी अचूक असून मिळणारी माहिती अव्वल ऐतिहासिक मानली जाते.

तथापि अशा प्रकारच्या अव्वल दर्जाची म्हणून समजल्या जाणाऱ्या या शकावलीमध्येही औरंगजेबाचा सरदार सर्जाखान याच्या पाडावाची तारीख मला चुकीची वाटल्यावरून हा लेख लिहीत आहे.

इ. स. १६८९ साली छत्रपती संभाजीच्या वधानंतर स्वराज्यातील ठाणी व गड एका पाठोपाठ एक मोगलांच्या हाती जाऊन राजारामास आपला जीव वाचविण्यासाठी जिंजीकडे पळ काढावा लागला. स्वराज्याची राजधानी रायगड, शाहू व येसूबाई यांच्यासह शत्रूच्या ताब्यात गेली. अशी अनेक संकटे कोसळून मराठे हवालदिल झाले असतानाच रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, धनाजी जाधव व संताजी घोरपडे या मराठी नेत्यांनी संकटाने खचून न जाता मोगली आक्रमणाविरुद्ध लढा देण्याची मसलत केली.

या मसलतीप्रमाणे त्यानी साताऱ्याच्या किल्ल्यास वेढा घालून बसलेला बादशहाचा सरदार सर्जाखान याच्यावर स्वारी करून, त्याला त्याच्या बायकामुलांनिशी कैद करून साताऱ्याच्या किल्ल्यावर नेले.

या संबंधीची जेधे शकावलीमधील नोंद अशी आहे– "वैशाख वद्य द्वादसी सातारियास सर्जाखाने वेढा घातला होता त्यावरी राजश्री रामचंद्र पंडित सचीव व राजश्री शंकराजी पंडित राजाज्ञा व संताजी घोरपडा व धनाजी जाधव जाऊन लडाई करून च्यार हजार घोडी व हती उंट पाडाव जाले. सर्जाखान पाडाव जाला लाख रुपया घेतला अणी सोडिला. प्रतापगड व वाई प्रांतीचे किले रोहिडा, राजगड, तोरणा हे किले राजश्री रामचंद्र पंडित व राजश्री शंकराजीपंत याणी घेतले ? "[१]

या नोंदीमधील " वैशाख वद्य द्वादसी" ही तारीख खरेजंत्रीप्रमाणे २५ मे १६९० अशी येते. प्रसिद्ध इतिहासकार सरकार व सरदेसाई यानी ही तारीख आपल्या ग्रंथात घेतली आहे.[२]

जेधे शकावलीमधील उपरिनिर्दिष्ट नोंदीप्रमाणे सर्जाखानाला कैद केल्यानंतर मराठ्यानी प्रतापगड राजगड व तोरणा किल्ले घेतले, या विधानास तत्कालीन जमाबंदीतील एक अस्सल कागद साक्ष आहे. त्यात म्हटले आहे. " रुस्तुमखान (सर्जाखानाचे दुसरे नाव ) सातारेखाली वेढा घालून बैसले होते. त्यावरी गनीम संताजी घोरपडा व धनाजी जाधव नि ।। राजाराम भोसले यानी स्वारी करून लढाई जाली. खाने अजमाचे फौज कुल बुडविली. त्यावरी गनीम वाईस गेले. वाईचा किला पाडून टाकिले. किलेदार लुटून सोडून दिले व जागा जागा ठाणी होती ती घेतली"[३] ह्या कागदाची तारीख १७ मार्च १६९१ अशी असून तो मोगली अंमलातील आहे. या साधनावरून सर्जाखानाच्या पाडावानंतर मराठे वाई-प्रतापगड भागात आले आणि त्यानी गड-कोट घेतले हे अधिक स्पष्ट होते.

या यशस्वी मोहिमेनंतर रामचंद्रपंताने ठिकठिकाणच्या देशमुखाना ही बातमी कळविली. मारणे देशमूख तर्फ मुठेखोरे व हैबतराव सिळंबकर, देशमूख तर्फ गुंजनमावळ याना पंताने लिहिलेली दोन पत्रे उपलब्ध आहेत. त्यात तो म्हणतो, "... आम्ही स्वारी करून वाईस आलो. वाईचा कोट रगडून घेतला. प्रतापगड आदिकरून किले हस्तगत केले... "[४] या दोन

१. द. वि. आपटे व स. म. दिवेकर, संपा – शिवचरित्र प्रदीप पृ. ३६

२. Jadunath Sarkar, History Of Aurangzib, Vol V, ed 1952, p 22; गो. स. सरदेसाई, मराठी रियासत – स्थिरबुद्धि राजाराम, १९३६, पृ. ३९

३. भारत इतिहास संशोधक मंडळ, त्रैमासिक, वर्ष ८, अंक ३, पृ. १५६

४. ग. ह. खरे संपा – शिवचरित्र साहित्य, खं. ६, पृ. ७७








पत्रावर एकच तारीख म्हणजे "सु॥ तिसैन आलफ ... छ ६ साबान " ही आहे. इंग्रजी तारीख ६ मे १६९० अशी येते.

वाई–प्रतापगड ही ठिकाणे सर्जाखानाच्या पाडावा-नंतर घेतली गेली हे सत्य असल्याने सर्जाखानाच्या पाडावाची तारीख रामचंद्रपंताने उपरिनिर्दिष्ट पत्रे लिहिण्यापूर्वी येते, म्हणजे सर्जाखानाचा पाडाव २५ मे १६९० रोजी झालेला नसून तो ६ मे १६९० पूर्वी झालेला आहे.

शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर } **जयसिंगराव भाऊसाहेब पवार**

---

## ( २ )

संपादक 'नवभारत'

सप्रेम नमस्कार, वि. वि.

'जुलै'चा अंक पाहिला. त्यांत डॉ. वा. दा. गाडगीळ यांचा "**कोणत्याहि संतास करता आला नाही असा चमत्कार संत गांधींनी केला,**" हा लेख समग्र वाचला, त्याबद्दल थोडेसे—

डॉ. वा. दा. गाडगीळ यांनी म. गांधीजींच्या जीवनांतील महत्त्वपूर्ण गोष्टींचा उल्लेख उत्तम रीतीने केला आहे. म. गांधी संत वृत्तीचे होते. त्यांचे आचरण साधूला लाजवील असेच होते. हे अक्षरशः खरेच आहे. पण कोणत्याही संताला करता आला नाही असा चमत्कार संत गांधींनी केला हे दाखविताना त्यांनी "**आमच्या साधुसंतांनी अनेक चमत्कार केल्याच्या दंतकथा आहेत. पण ते सर्व चमत्कार निसर्गाविरुद्ध असे आहेत !**" असे एक विधान केले आहे. ते मात्र आक्षेपार्ह आहे. या लेखाला दिलेले शिर्षकहि अनाठायी आहे. लिखाणाचा त्या शिर्षकाशी तसा अन्योन्य संबंध दिसत नाही.

उगीचच जुन्या संतांवर आग पाखडणे वा संतांच्या सर्वच्या सर्व चमत्कारांचे त्या त्या वेळेच्या वस्तुस्थितीचे वा वातावरणाचे विश्लेषण, परीक्षण न करता सर्वच संताच्या चमत्काराला दंतकथा म्हणून हिणविण्याची ही विद्वानांची 'फॅशन' झालेली दिसते. त्यातीलच एक डॉ. वा. दा. गाडगीळ आहेत याची साक्ष त्यांच्या या विधानावरून मिळते. डॉ. गाडगीळ यांना माझे नम्रपणे आवाहन आहे की त्यांनी, संताचे चमत्कार निसर्गाविरुद्ध होते हे सिद्ध करून दाखवावे. निदान आता प्रसिद्ध होणाऱ्या विज्ञान कथा, विज्ञान शोध, अंतराळात तरंगणारा मानव, अग्निबाणातून चंद्रावर उतरू पाहाणारा मानव, हे सर्व ज्या दृष्टिकोणातून तपासले जात आहे, जो विज्ञानवादी दृष्टिकोण घेतला जातो तोच दृष्टिकोण, त्याच कसोट्याही संताचे चमत्कार संताच्या हातून घडलेल्या गोष्टींशी लावून संताच्याही विज्ञान शाळा होत्या, त्यांच्या प्रयोगशाळेत घडलेल्या सर्वच गोष्टी, कथा नव्हत्या, त्याही निसर्गसंमत होत्या, निसर्गही त्यांच्या मागे होता, कोणाही संतांनी निसर्गाविरुद्ध असे काहीही केलेले नाही. वा त्या दंतकथाही नव्हेत. केप केनडीच्या प्रयोगशाळेतून घडणाऱ्या गोष्टी, उडणारे अग्निबाण जेवढे सत्य मानले जातात तेवढेच सत्य, वा ज्या संताच्या चमत्कारांमुळे विश्वधर्म, विश्वशांतीचा संदेश, विश्वस्वधर्माचा सूर्य नित्य उगवावा म्हणून केले गेलेले ते प्रयोग आहेत. जे ऋषीनी केले तेच वर्तविण्यासाठी आम्ही आलो आहोत. हे त्यांचे सांगणे आहे.

म. गांधीजींनी व प. पू. विनोबाजींनी संतांच्या चमत्काराला कधीही दंतकथा म्हटलेल्या नाहीत. वा निसर्गाविरुद्ध म्हटलेले नाही. उलट "**जे जुन्या संतांनी केले ते इतके मोठे होते की त्यांच्या मागे त्यांचे म्हणणे पूर्ण करण्यासाठी, जनता, ईश्वर, निसर्ग सदैव हात जोडून उभा असे, संतांनी म्हणावे आणि तसे घडावे हे अगदी सहज होते. मी त्याला चमत्कार म्हणत नाही, त्या गोष्टी सहज घडलेल्या आहेत.**" असे संताविषयी आदराने म्हणणाऱ्या महात्माजींच्या लेखांत म. गांधींचा मोठेपणा दाखविण्यासाठी डॉ. गाडगीळ यांनी जो एवढा मोठा प्रपंच केला आहे त्याला या शीर्षकाने व त्यांच्या या संतविषयक विधानाने गालबोट लागले आहे. कोणीही उठावे आणि जुन्या संतांना सहज नांवे ठेवावीत, त्यांना चमत्काराच्या खाईत लोटावे हे घृणास्पद आहे. संत हे राष्ट्रपुरुष होते. त्यांनीही राष्ट्रासाठी भरपूर कष्ट घेतले आहेत. निवृत्तिमार्गाचा वा प्रवृत्ति मार्गाचा अवलंब करणारे असोत सारेच संत विश्वप्रेमी होते. निसर्गाविरुद्ध

वा नियतीच्या विरुद्ध काहीच केलेले नाही. तेव्हा डॉ. गाडगीळ यांनी संत गांधी म्हणून लिहिताना संतांच्या विषयीचे जे गढूळ व स्वतःच्या विकारी वृत्तींचे गरळ लेखणीतून ओकण्याचा जो प्रयत्न केला आहे त्याला विरोध करण्यासाठी मी हे पत्र पाठविले आहे. म. गांधीजी संतवृत्तीचे होते. संतवृत्ति आचरता आचरता ते संत झाले, महात्मा झाले. त्यांच्या जीवनाचे सार त्यांच्याच शब्दात, "माझ्या चित्तवृत्तीत हळू हळू बदल होत जाऊन ती ईश्वरता ओळखूं लागली. हे सारे प्रार्थना, सदाचरण, सत्याने घडविले."

हा भागही म. गांधीजींच्या जीवनांतील अत्यंत महत्वाचा असा आहे. डॉ. गाडगीळ यांनी बाकीच्या केलेल्या उत्तम विवेचनांत संताविषयींच्या या चारच ओळीमुळे साऱ्या लेखाला त्यामुळे कमीपणा आलेला आहे, असे मला वाटते. कधीकधी वाटते, त्यांत डॉ. गाडगीळांची काय चूक आहे. या घातुक विचारसरणीचे संताना, संतकथेला केवळ भावुक, दंतकथा, निसर्ग-विरोधी म्हणण्याचे पीक विद्वानांत वाढत आहे, त्यांतलेच हेहि एक!

मधुकर द. जोशी
२।७।६९
[ सहसंपादक 'व्यापारी मित्र' ]

---

## ( ३ )

नवभारत जुलै अंकामध्ये डॉ. वा. दा. गाडगीळ यांनी पान ४१ वर गांधीजींच्या चमत्काराविषयी मुदीर्घ मथळा देऊन पान ४८ पर्यंत लेख लिहिला आहे. लेखातील विधाने करताना बरीच लवचिक भाषा वापरून आक्षेप न यावेत अशी दक्षता घेतली असली तरी लेखावरील घसघशीत मथळ्यामुळे त्याचे मत स्पष्ट झाले आहे. गांधीशताब्दि निमित्त महात्मागांधींचा गुणगौरव योग्यच आहे. हा लेख पट्टाभिसीतारामय्या यांच्या कॉंग्रेसच्या इतिहास या ग्रंथाद्वारे लिहिला आहे. तथापि त्यात पाने ४७ व ४८ वर पुढील विधाने केली आहेत, त्यासंबंधी दुसरी बाजू थोडक्यात मांडतो.

( १ ) पान ४७ सत्य, अहिंसा, असहकार, अनत्याचार या चार सूत्रांनी निर्भयता व क्लेश भोगण्याचे सामर्थ्य लोकामध्ये उत्पन्न केले व त्यामुळे स्वातंत्र्य मिळणे हा चमत्कारच आहे इ.

**उत्तर**– आत्मक्लेशाने हृदयवर्तनाचा प्रयोग मुस्लीम व पोर्तुगीजसरकार यांचे बाबतीत असफल झाला. मुसुलमानांनी मोपल्यांच्या बंडापासून तो डायरेक्ट-ॲक्शनपर्यंत दंग्यावर दंगे उठविणे व लाखो हिंदु मारून पाकिस्थान मिळविणे. पोतुर्गीज सरकारने गोवा सत्याग्रहांत एकंदर ३५ लोक गोळ्या घालून ठार केले. शेवटी बंदुकी पुढेच पोर्तुगीज नमले.

( २ ) हिंदुमुसुलमानांची एकी करण्यात गांधीना यश आले नाही. कारण "इस्लामव्यतिरिक्त इतर सर्वधर्म "तुच्छ" इतर सर्व लोकही काफर हा मुस्लीमांचा दूराग्रह कधीही जाणार नाही हे महात्माजींच्या ध्यानी आले नाही.

**उत्तर**:– गांधीजी बॅरिस्टर होते. 'ता' म्हणताच ताकभात ओळखणाऱ्या गांधींना मुस्लीमांचा स्वभाव समजला नाही, असे म्हणणे साहसाचे आहे.

स्वामी श्रद्धानंदांची हत्या १९२६, त्याच्या पाठोपाठ आर्य समाजाचे पुढारी लाला नानकचंद यांचा खून, रंगेला रसूलचा कर्ता–राजपालची हत्या, नथुरामल शर्माचा खून १९३४; त्याचप्रमाणे रामराव देशमुख शिराळे (वऱ्हाड); इंदूरचे चंद्रिका प्रसाद; कानपूरचे गणेश शंकर विद्यार्थि, सोलापूरचे कुलकर्णी वकील; गोव्याचे पुरुषोत्तमदास शहा इत्यादि शेकडो वीरांचे मुडदे गांधीजी हयात असतानाच पाडले गेले. शिवाय मलबार, कोहाट, साहारानपूर, कलकत्ता, कानपूर, मुंबई, दावणगिरी इत्यादि ठिकाणची बंडे गांधीजीना माहित होती. फार काय पण कोकोनाडा येथे कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून गाजलेले मौ. महमंद अल्लीचे उद्गारहि "I do hold even an adulterous and fallen musleman be better than Gandhi (थॉटस ऑन पाकिस्तान पान ३०१–३०२) गांधीना चांगले ऐकू आले होते.

तात्पर्य महात्माजींच्या लक्ष्यात ही गोष्ट आली नव्हती, असे नव्हे तर ते मुसुलमानांच्या बाबतीत मुद्दाम दुर्लक्ष्य करित. त्यामुळेच कॉंग्रेस मुस्लीम धार्जिणी झाली! मी स्वतः येरवडा जेलमध्ये कै. वा. हरिभाऊ फाटक यांच्यासह जाऊन मुस्लीमांची हिंदु-










विषयीं किती असहिष्णुता आहे हे अनेक ग्रंथाधारे कुराणाधारे व प्रत्यक्ष उदाहरणे देऊन गांधीजींना सांगितले. त्यांनी फक्त ऐकून घेतले व गप्प बसले. पुढे मी त्या संबंधाचे पुस्तक New light on Islam हे त्यांचेकडे पाठविले. त्यांनी मला लिहिले की " I did not see light in your Book माझे ते पुस्तक गांधिवधोत्तर भस्मसात झाले. तथापि त्यांतील बरेच उतारे " Thoughts on Pakistan या अंबेडकरांच्या पुस्तकात आहेत. त्यातील फक्त स्थळे येथे देतो. डॉ. गाडगीळ सदृश वाचकांनी ते उतारे पाहावेत. पाने १५२।१५३, २२४,२९३,३३२,३३३ तसेच जदुनाथ सरकारकृत हिस्टरी ऑफ औरंगजेब दुसरी आवृत्ति. पाने २४९ ते २५७ पर्यंत वाचावीत. मी माझ्या पुस्तकात हिंदुमुस्लीमांच्या एकीविषयी शेवटी विस्तृत प्रकरण लिहिले आहे. त्यांतील दोनच मुद्दे येथे देतो : ( १ ) मुस्लीमानी आम्ही जेते आहोत, हिंदूवर राज्य करणेचा अधिकार आहे, हा उच्च गंड सोडावा. कारण भारतीय सर्व मुस्लीम मूळचे हिंदूच होते. कुराणात मूर्तिपूजक काफिराविषयी अत्यंत अनुदार संज्ञा असल्या तरी त्या तत्कालीन कुरेशी अरबांना उद्देशून होत्या. कारण तेच पैगंबराचे छळक होते त्या आज्ञांचा भारतीय मूर्तिपूजकाशी काहीही संबंध नाही. असे भाष्य करणारे परिवर्तनवादी मुल्ला व मौलवी मुस्लीमामध्ये उत्पन्न झाले पाहिजेत. व त्यांनी हिंदूतील परिवर्तनवादी पंडिताप्रमाणे लोकमत बनविले पाहिजे. इत्यादि (३) पान ४८ मनुष्य हानि न होता देशास स्वातंत्र्य मिळाले ! स्वातंत्र्याप्रीत्यर्थ मूर्खपणाचे बलिदान झाले इ.

उत्तर हिंदुस्थानचे पाकिस्थान होण्यास सुमारे २ कोटि लोकांचे बलिदान झाले असे त्या कमिटीवरील एक सदस्य जस्टिस कै. वा. भाऊ सो. ढवळे आय. सी. एस्. यांनी मला स्वतः सांगलीस I. C. S. सर साठे यांच्या समक्ष सांगितले. तसेच आर्थिक हानि खर्व, निखर्व अशा संख्येत मोजता येईल, अशी झाली. एवंच साक्षात रणांगणावर लढून जेवढी हानि झाली नसती तेवढी द्रव्य व मनुष्यहानि अहिंसा, सत्य, अनत्याचार, असहकार या चार सूत्रामुळे झाली !

मुलुंड, मुंबई — **महादेवशास्त्री दिवेकर**








# प्राज्ञपाठशालामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश- व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश- उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश- संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ६३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ७ ( संपूर्ण ) | | २५०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०·०० |
| (८) नवमानवतावाद ... ... ... | | २·५० |
| (९) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३·०० |
| (१०) चार्वाक- इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| | ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | ३·०० |
| (११) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | | २·६० |
| (१२) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | | |
| | ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... | २·०० |
| (१३) सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती ( प्र. रा. देशमुख ) | | ४·०० |
| (१४) इतिहासाचे तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | | ६·०० |
| (१५) लोकशाहीचे धोके ( श्री. पन्नालाल सुराणा ) ... | | २·०० |
| (१६) भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) | | २·०० |